


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका



# दीपावली

डिसेंबर १९७० ● वर्ष २६ वे ● मूल्य १॥ रुपया

## क्रिकेटशौकिनांसाठी खास पुरवणी

## श्रे य ना मा व ळी

◆ संतश्रेष्ठ नामदेव.... भारतात गाजलेला महाराष्ट्रीय संत...**प्रा. ल. ग. जोग** ◆ लय–योगी बा. भ. बोरकर....सन्माननीयांचा सन्मान...**प्रभाकर अत्रे** ◆ क्रिकेटच्या क्षितिजावर उगवता तारा बॅरी रिचर्डस....मैदानावर गर्दी खेचणारा क्रिकेटपटू ....**बाळ ज. पंडित** ◆ टॉम ग्रॅव्हेनी....चरितार्थासाठी क्रिकेटच्या माहेरघराला रामराम...**र. गो. सरदेसाई** ◆ षटकारांचा बादशहा...सी. के... भारतीय क्रिकेटची पताका उंच राखली... **दिवाकर बापट** ◆ भारतीय क्रिकेट संघाच्या कप्तानपदासाठी शिलेदारांची शर्यत.... वेस्ट इंडिजच्या दौऱ्यावर कप्तान म्हणून कोणाला पाठवावे...**अरविंद ताटके** ◆ सोनियाचा दिवस ...मैत्री महाग पडली...**शां. पां. कणेकर** ◆ अ-पूर्व जर्मनी....संस्कृत नि संस्कृती जपणारा देश...**ह. सी. उसेकर** ◆ पहिली रात्र....कशी पार पडली? ....**पंडित क्षीरसागर** ◆ विडा रंगला असा....प्रेयसीकडील विड्याचा असा स्वीकार.... **अरविंद ताटके** ◆ क्रिकेटमधील गंमतीजमती....**डॉ. वसंत नाईक याशिवाय नेहमीची वाचनीय सदरे आणि**

* **मासिक विंगचित्रमाला** *

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु. + रजि. पोस्ट ९५ पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही.



Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.




अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४
**टेलिफोन :** ★ **तारेचा पत्ता**
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑर्डरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथ छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

## साधनेला सुटी नाही !

सृष्टीला सुटी नसते. सूर्य सुटी घेत नाही. चंद्र किरणे वोपीत व पृथ्वीचे 'शांतवन' करीत राहतोच. निर्झर–नद आपली स्तोत्रे गात बहात राहतातच. चांदण्यांचा शालू नेसून रात्री ठुमकत ठुमकत केव्हा येतात आणि संपतात कळत नाही. पक्ष्यांची भावगीते कसलीही कळ न दाबता उगवतीला सुरू होतात. निसर्गातलं कुणीच सुटी घेत नाही. निसर्गातल्या, सृष्टीतल्या कलात्मक व अन्य सौंदर्यावर पोसली वाढलेली 'दीपावली' सुटी कशी घेणार ?

दिवाळीचा आम्हाला 'शीण' येत नाही. कारण दिवाळी अंक ही एक श्रद्धा, साधना आहे असेच आम्ही मानीत आलो आहोत.

ह्या श्रद्धेला गेल्या पंचवीस वर्षांप्रमाणेच यंदाही मराठी साहित्य-कला रसिकांनी प्रचंड प्रतिसाद दिला आणि म्हणून सर्वप्रथम त्यांना धन्यवाद व त्यांच्यातल्या रसिकतेला अभिवादन !

'दीपावली'च्या दिवाळी अंकाबद्दल अनेक रसिकांची पत्रेही आली आहेत. दीपावलीतल्या साक्षेपी प्रयोग-प्रयत्नांबद्दल त्यातून 'दाद' व्यक्त झाली आहे. 'आवडले–नावडले'चा वैयक्तिक भागही त्यात आहे. परंतु एक गोष्ट मात्र साऱ्यांनी मान्य केली आहे. ती आम्हास महत्त्वाची वाटते–'संपादकीय दृष्टि आणि प्रयत्न' साऱ्यांनी मान्य केले आहेत.

दीपावलीत नुसती 'मोठी' 'चांगली' नावे नसतात. त्यांचे चांगले साहित्यही असते. पण चांगल्या साहित्याबद्दल 'नवे जुने' हा भेद दीपावलीजवळ नाही. त्यामुळे नव्या (मानल्या गेलेल्यांचे) चांगले, निवडक साहित्यही बड्यांच्या पंक्तीला येथे बसू शकते. यंदा नामवंत कवींकडून आम्ही गद्याची मागणी केली होती व (तथाकथित) संतप्तांची कविता आम्ही प्रसिद्ध केली. ती देतानाही काही निवडीचा साक्षेप पाळलाच. कारण 'नवे ते सर्वच चांगले' अशा भावड्या श्रद्धा उरी जपण्याचे 'दीपावली'चे वय नाही. तसे कारणही नाही. 'कादंबरी' (श्रीराम कामत) हीही खास लिहवून घेतलेली. स्वतःचीच शैली असलेली व 'ठरीवाच्या पलिकडची' ही कादंबरी लोकांना आवडली. यंदाच्या चित्रात 'बटिक पेंटिंग्ज'चा एक आभास उत्पन्न करण्याचा आम्ही प्रयत्न केला. त्याचेही जाणकारांनी स्वागत केले. मागण्याही (दुरून दुरून) आल्या. चित्रकार गोडसे यांच्या लेखावर तज्ञांचे फोन व पत्रे आली––

न आलेला शीणही गेला ! !

आणि म्हणूनच हा अंकाचा (आणि क्रिकेटचा) मांडलाय डाव !

मूड चांगला असला की डाव रंगतो. कला रंगते. मैफल सजते. क्रिकेट अंकाची मैफलही तशीच सजली आहे. 'क्रिकेट' हा इथे तरी खेळांचा बादशहा म्हणून राहिला आहे. 'देशी-विदेशी' टीकेचे चेंडू लोकप्रियतेच्या बॅटीने तडीपार केले आहेत. आणि अनेक चौकार, षट्कार, लेग कटस् आणि गुगली टाकल्या गेल्या आहेत. अखेर अंपायर्स तुम्ही आहात. अंदाज तुम्ही बांधायचे आहेत. आणि अंतिम निर्णय तुम्हीच द्यायचे आहेत. पण 'दीपावली'चे क्रीडांगण नहमीच हिरवे व उत्फुल्ल रहात आले असल्याने हाही डाव झकास रंगला असाच कौल तुम्ही द्याल असा आम्हास विश्वास वाटतो.

—संपादक

### क्षमस्व !

'दीपावली'चा दिवाळी अंक नेहेमीप्रमाणे हां हां म्हणता संपून गेला. अजूनही अनेक ठिकाणांहून अंकमागणीची पत्रे येत आहेत, परंतु दिवाळी अंक शिल्लक नसल्याने पुरवठा करता येत नाही; त्याबद्दल रसिक वाचक आणि विक्रेते यांनी क्षमा करावी ! 'दीपावली'वरील लोभ असाच निरंतर ठेवावा.

—संपादक



अनुक्रमणिका

## एका गोड भावावर्तात रमलो

स. न. वि. वि.

'सालावाद'प्रमाणे आपला दिवाळी अंक पावला आणि एका गोड भावावर्तात मन रमून गेले. इथं एक सुरम्य जलाशय आहे. सूर्य डुबायला आला आहे. वृक्ष ध्यानस्थ झाल्यासारखे आहेत. मनात अकारण असीम उल्हास आहे. आणि अशा वेळी एका घनतरुतळी बसून मी 'दीपावली' वाचतो आहे. 'दाद' पाठवणं अपरिहार्य झालं म्हणून लिहितो आहे.

कथा, रोचक विनोद आणि मार्मिक विगचित्रमालिका; यांनी 'दीपावली'ची रसिली प्रकृती निकोप असल्याचा पुन्हा एकदा निर्वाळा दिला आहे. तर साधल्यांच्या 'भतृहरीच्या ऋतुचक्रा'मुळे 'ऋतुमती'ची ओढ प्रत्येक मद्होष रसिकाला लागल्याविना राहाणार नाही. प्रत्येक ऋतूत मदनक्रीडेचा वृक्ष फुलतच राहातो. त्याला कुठल्या 'मालविके'ची लाथ लागते? ते रसिकांनी शोधून ठेवलंय. भतृहरीइतका जीवनाचा साक्षेपी भाष्यकार विरळा. उत्कटता हा त्याच्या स्वभावाचा जबरदस्त पैलू आहे आणि मानसिक उत्कटतेची प्रतिक्रिया उत्कटच असते हा मानसशास्त्राचा सिद्धान्त आहे. मग उत्कट शृंगाराची प्रतिक्रिया तेवढ्याच उत्कट भाषेत होईल तर वीरतेत होईल. पण जी होईल ती प्रचंड, भव्य होईल. सामान्यांचं सारंच सामान्य! म्हणूनच भतृहरिच या दोन्ही रचना करील काय? हा सामान्यांचा प्रश्न आहे. या स्वभावविशेषामुळेच भर्तृहरीच्या हृदयात, पराकाष्ठेची शृंगारभावना वास करीत असताना, त्याच्या अंतरीचा आवाज "धिक् तंत्रतांच मदनंच इमांचमांच" म्हणत होता. वा! साधल्याना हे 'भर्तृहरीकाव्याशयग्रहणनिरूपण' मोठं छान साधलंय.

गोडशांचा 'शिवपत्रपरिचय बहुत नेटका पाहोन मनि बहुत संतोष जाहला. शिवप्रतापाने मन कोदोन गेले.

आपली चित्रमालिका या वर्षी मोठी आकर्षक झाला आहे. नाना रसांचा वस्त्रप्रावरणं लेऊन ही गोंडस बाळी 'दीपावली'च्या राजरस्त्यातून ठुमकत चालली आहे. रसिकजन 'रस्ते दुतर्फा' भरून हिचे 'पदलाघव' पहात आहेत. भास, भवभूती, भट्टनारायण आणि कविकुलगुरू यांच्या 'नायिका' मनाला गहिरा अनुभव आणि दुर्मिळ आनंद देऊन गेल्या. पन्नाशीची झुळुक लागलेल्या अग्निमित्राच्या हृदयात 'धडकन' पैदा करणारी चारुगात्री, मालविका पाहिली नि वाटलं,

"शोकाकुलहि अशोक फुलला.
पदरज धरिता उरीं, कामरूप शर्वरी,
जाहली मालविका साजरी.
अग्निमित्र अनुरक्त होतसे, हार घेतसे करिं
मदनपुष्प गोजिरी, पावली मदनव्यथा बावरी".

तीच गोष्ट मालतीची. पूर्णचंद्राच्या साक्षीने ही तन्वंगी आलिंगनमय झाली. पाठीवर केसांची रात्र घेऊन हिचा मुखचंद्र मदनरसात भिजून निघाला. माधवाच्या बलदंड कथेत हे 'कामशिल्प' किती वेळ राहिले असेल? मनाला पत्ता लागेना! शेवटी चिंतनाचे शब्द झाले--

पूर्णचंद्र अवकाश उजळतो, मदिरधुंद यामिनी
कचपाश-मुक्त कामिनी, उपवनि, झाली अभिसारिणी
समाधिस्थ माधवें तशी ही कवेत धरली मनी
मालती जणु ही मनहंस मोहिनी
आणि वासवदत्ता तर मूर्तिमंत विरहिणी बासदत्ता--

स्वप्निल, तरीही पार्थिव. जड वेदनाना उरी शोधणारी, घोषवतीच्या सन्निध पण झंकारापासून दूर....शतयोजने दूर. हेच असते प्रेमिकांचे जिणे. जगत असून मरणे, पार्थिवासमोर चैतन्याचे हरणे! अंगार पिऊन पालवणे हे या फुलांचे असते जगणे.

शेवटची याज्ञसेनी म्हणजे मूर्तिमंत तेजस्विता. भारतीय स्त्रीच्या अस्मितेचा एक लखलखीत आविष्कार. पुरुषार्थावर अपरंपार प्रेम करणारी आणि 'षंढा'चा धिक्कार करणारी. 'व्रजान्तिते मूढधियः पराभवं भवंति मायाविषु ये न मायिनः' हा कठोर राजव्यवहार सांगणारी. प्रियकराच्या बाहूत सहस्रहत्तीचे बळ आणून देणारी तिची तेजोगर्भ वाणी कानात ऐकू येऊ लागली--

"तडित् कडाडे आकाशीची ही तर सौदामिनी
वेणिसंहारनायिका, गरजे तेजस्विनी
पुरुषार्थ प्रेमिका, वृकोदराची रमणी
तेजाचा कल्लोळ भासली, भली याज्ञसेनी"

एक अपूर्व आनंद प्राप्त करून दिल्याबद्दल आपल्याला शतशः धन्यवाद!

माथेरान ३-११-७० — आपला **अशोक परांजपे** (हरिपूरकर)




## विक्रीमध्ये क्रांति

स. न. वि. वि.

यंदा 'दीपावली'च्या दिवाळी अंकाने विक्रीमध्ये क्रांतीच केली. अपेक्षेपेक्षा बऱ्याच जास्त प्रतींची विक्री झाली. दीडपटीपेक्षाही अधिक अंक खपले. धन्यवाद!

**आप्पा बळवंत चौक, पुणे-३०.** — आपला **डी. एन. खरे** **श्रीकांत एजन्सी**

(पान ५८ वर पहा)




अनुक्रमणिका








# संतश्रेष्ठ ☆ नामदेव ☆

—प्रा. ल. ग. जोग

**संतश्रेष्ठ नामदेव यांची सातवी जन्मशताब्दी केवळ महाराष्ट्रातच नव्हे, तर साऱ्या देशभर नुकतीच उत्साहाने साजरी झाली. महाराष्ट्रांतच संत नामदेव जन्मशताब्दी समारोहासाठी शासनाने राज्य–पातळीवर एक समिति नियुक्त केली होती. त्या समितीचे एक प्रमुख सदस्य प्रा. ल. ग. जोग यांनी खास 'दीपावली' साठी लिहिलेला लेख येथे प्रकाशित करून आम्हीही संतश्रेष्ठ नामदेवांना ही श्रद्धांजली समर्पण करीत आहो—संपादक**

नामदेव संत होते. जगदोद्धाराची भूमिका त्यांनी घेतली होती. सर्व संतांचे ते जीवितकार्य असते, जीवनहेतू असतो. महाराष्ट्रापुरते बोलायचे तर बहुतेक ज्येष्ठ संत हे उत्तम कवी होते. नामदेवही संत व कवी अशा दोन्ही दृष्टीनें अभ्यसनीय होत. संतांना अध्यात्मविद्येचा सुकाळ करायचा होता. त्यात काहीशी प्रचारकाचीही भूमिका असते. परंतु सद्वर्तन, इंद्रियनिग्रह, अपरिग्रह इत्यादी, साधुत्वाची लक्षणे त्यांच्यात असतात. ते जे उपदेशितात ते स्वतः आचरणात आणीत असतात. म्हणून त्यांच्या वाणीला आत्मप्रत्ययाचे तेज प्राप्त होते. पुष्कळदा ते प्रगटचिंतनच (loud thinking) करतात म्हणजे त्यांच्या अशा रचनांमधून केलेला उपदेश प्रथम स्वतःचा अनुभव म्हणून व्यक्त होतो. आणि अनुभूतिस्पर्शामुळे त्यात भावनेचा खळाळत जाणारा प्रवाह आढळतो. नामदेवांच्या कवितेला असा उत्कट अनुभवस्पर्श आहे. भक्तिभावनेचे स्वरूप अभंगरचनेतून वारंवार पाहायला मिळते. अनेक नामदेवांची रचना सारखी डोळ्यापुढे उभी राहाते व हे अनेक नामदेव एकमेकात इतके मिसळून गेले आहेत की संतनामदेवांच्या भक्तिपर रचनेचे वेगळे स्वरूप पुष्कळदा ओळखणे अवघड होते. विषयासक्त झालेल्या मनाला पंढरीरायाच्या चरणाकडे खेचण्यासाठी केलेल्या प्रयत्नांची शिकस्त एका अभंगात येते. आयुष्य संपत आले तरी मनातील 'कल्पना' संपत नाहीत; म्हणून हे देवा तू संकटातून, जन्ममरणातून सोडव म्हणून उत्कटपणे धावा करणारा हा अभंग भावस्पर्शी उतरला आहे. 'असा जन्म, अशी वासना, माझ्या ठिकाणी तू का निर्माण केलीस, असा प्रश्न मोठ्या काकुळतीने केला आहे. आपणाला जन्माला घालून ह्या गर्भवासाचे चक्र का सुरू केले ? असे देवाला ते विचारतात. या व्याकुळपणाचे दर्शन कित्येक अभंगातून आढळते. संत हे आपली माउली असून ती प्रेमपान्हा देणारी आहे असे रूपक वापरून कधीकधी ते अंतरातली व्याकुळता व्यक्त करतात तर देवाचे दर्शन घेता यावे म्हणून वाट पाहाता पाहाता डोळे शिणले व मन तीव्र अवस्थेने व्याकुळ झाल्याचे चित्रण करताना पक्षिणीने अंडजाला विसरणे, कुरंगिणीने पाडसाला विसरणे, कसे शक्य आहे, असे प्रश्न विचारून अखेर प्रेमपान्हा पाजण्याची विनंती केली आहे. या अभंगातील वात्सल्य व तळमळ शब्दांनी व्यक्त झाली असली तरी त्याचे तस्सेच वर्णन करणे केवळ अशक्य होईल. देवदर्शनासाठी वाट पाहाणे ही तर भक्तीमधली एक अनिवार्य घटना म्हणता येईल—

भेटिलागी जीवा लागलीसे आस।
पाहें रात्रंदिवस वाट तुझी॥
पौर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन।
तैसें माझें मन वाट पाहे॥
दिवाळीच्या मुळा मोठी आस केली।
पाहतां वाटुली मायबापा॥
नामा म्हणे आम्ही लेंकराच्या जाती।
भेटावया खंती वाटतसे॥

या प्रसिद्ध अभंगातील भावदर्शन केवळ मधुर आहे. विशेषतः दिवाळीच्या आमंत्रणाची आईकडून वाट पाहाणारी—नवविवाहित कन्येचा दृष्टांत इतका उत्कट व चपखल आहे की त्याचे अधिक निवेदन करणे म्हणजे एकप्रकारे त्याची गोडीच कमी करण्यासारखे आहे !





अनुक्रमणिका

नामदेवांच्या भक्तीला जशी विविध अंगे आहेत तशीच अनुरूप अशी त्यांची शैली आहे. संताच्या द्वारींचा द्वारपाल होण्याइतके विनम्र भाव व्यक्त करणारे नामदेव पूर्णपरिपूर्ण भक्त झाल्यानंतर आपला अनुभव मोठ्या आत्मविश्वासाने व निश्चयात्मकरीत्या वर्णन करतात. ते म्हणतात, "आम्हाला आता देवाचे वर्मच गवसले आहे. आता आम्ही भागवतधर्म सोडणार नाही. भक्तीचा भुकेला देव वैकुंठ सोडून पृथ्वीवर येतो. हे 'वर्म' कळल्यावर आम्ही संतचरणांच्या द्वारा आत्मसात करू. त्याचे चरण नि आमचा गळा आता एकत्र गोवला आहे. देवभक्ती व आत्मविश्वास यांचा परमोत्कर्ष पाहायला मिळतो तो त्यांचा अभंग तर अक्षरवाङमयात जमा होण्याइतका चांगला आहे. 'ज्या बोलाने विठ्ठल प्रेमसंमतीने डोलू लागेल असे शब्द आपली वाणी उद्गारील.' परमेश्वरप्रीतीचे सर्वांगपरिपूर्णत्व व्यक्त करण्यासाठी 'प्रेम सर्वांगाचे ठायीं' ही वापरलेली प्रतिमा कमालीची बोलकी उतरली आहे. परंतु विशेष म्हणजे 'आपण अशा एका धामी पोचू की तेथे आम्ही निरंतरच राहू' हा आत्मविश्वास धीटपणाने व्यक्त केला आहे. अशा या आत्मविश्वासाच्या पातळीवर पोचलेल्या भक्तीला चांगलीच धार येते. भक्तीने परमेश्वराला वश केल्यावर स्वर्गादिसुखांची कोण पत्रास ठेवणार ? म्हणूनच पंढरपूरच्या विठ्ठलदर्शनाने मिळणाऱ्या आनंदाचे वर्णन करताना

आम्ही स्वर्गसुख मानूं जैसा ओक।
देखोनियां सुख पंढरीचें॥

असे ते ताठपणे सांगतात. एवढ्यानेच भागत नाही तर वैकुंठवास वा कैलासवास (शैववैष्णवांचा हा एकत्र उल्लेख मोठा सूक्ष्म पद्धतीचा आहे) यांची गरज नाही असे ते सांगतात व पुढे 'एक विठ्ठलाच्या ध्यानापुढे' संपत्ती, संतती किंवा मान यांची काय गरज असे विचारले आहे. याही पुढचे पाऊल म्हणजे आपल्या भावसत्यासाठी परमेश्वरालाच साक्षीदार बनविले आहे.

सत्य कीं मायिक आमुचें बोलणें।
तुझी तुज आण सांग हरी॥

अशी शपथ घातली आहे. भक्तीचे नवविधा स्वरूप आळवण्यात आत्मसमाधान कवीला झाले असले पाहिजे. पण नामदेव हे केवळ आत्मसाक्षात्कारापुरते नव्हते. त्यांच्या मनात सामान्यजनांसंबंधी अपार प्रेमभावना होती. करुणा होती. म्हणूनच त्यांच्या स्वतःच्या जीवनकर्तव्याचा महत्त्वाचा भाग म्हणून

नाचूं कीर्तनाचे रंगीं
ज्ञानदीप लावूं जगीं॥

असे ते म्हणतात. यात एक मोठा लक्षणीय भाग होय. या प्रसिद्ध अभंगात 'भक्तीचे दीप' असे न म्हणता ते 'ज्ञानदीप' असा उल्लेख करतात. वस्तुतः नामदेव हे केवळ भक्तच होते असे म्हणणाऱ्यांनी या शब्दाचा नीट विचार करायला हवा. भक्तीच्या विविध छटा काव्याच्या श्रेष्ठ पातळीवर नेण्याचे नामदेवांचे काव्यकौशल्य अव्वल दर्जाचे आहे हे निस्संशय. आपणच आपल्याला खोटचालटक्या भावनेत गुरफटून घेतले हे सांगण्यासाठी घेतलेला वासराचा दृष्टांत, नामगायनाने आपली तहानभूक हरवून तृप्ती कशी आली याचे वर्णन करणारा अभंग, परमेश्वराचे आमंत्रण भेटीसाठी कधी येईल म्हणून वाट पाहाणे, तापत्रयानी जाजावलेल्या मनातील त्रागा, ज्या देवाची भक्ती करावी त्याच देवाचे मिळणारे रूप इत्यादी विविध भावाविष्कार काव्याचे सौंदर्य प्रगट करतात. भक्तीच्या विविध अवस्था एकत्रपणे मांडणारा त्यांचा एक प्रसिद्ध अभंगही मिळतो. भक्तीच्या वर्णनात सगुणरूपाची रेखाटलेली चित्रे अत्यंत जीवंत व दृग्प्रत्ययी उतरली आहेत. एका प्रसिद्ध गौळणीत प्रथम बालकृष्णाच्या क्रीडेचे वर्णन आले असून त्याचे अखेरीस आपणाला चरणसेवा घडावी अशी आतुर इच्छा व्यक्त केली आहे. 'वाक्या वाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी'मधील चित्र व 'लपतछपत येतो हरि हा राजमंदिरी, नंदासि टाकुनि आपण बैसे सिंहासनी' या चरणातील कृती वात्सल्यचित्र उभे करतात. केव्हा केव्हा विठ्ठलाचे म्हणून काढलेले शब्दचित्र रेखाचित्र बनून जाते.

दीनांची माउली, आजि म्यां देखिली॥
कटीं ठेवूनियां कर, उभी राहे विटेवर॥
मुगुट रत्नांचा साजिरा, वरि मोतियांचा चुरा॥
रूपलावण्य गोजिरें, हृदयीं पदक साजिरें॥
कांसे पिवळा पितांबर, चरणी ब्रीदाचा तोडर॥
भक्तां कृपेची सावली, नामा वंदी पायधुळी॥

अशा अभंगात वस्तुनिष्ठ दर्शनदायी चित्र उभे होते तर

काळा गे दादुला, पाहातां आकळु॥
तो जाला गोवळु, नंदाचा रे॥

यातील काळ्या रंगाचा वारंवार उपयोग करून विठ्ठलाचा काळासावळेपणा व्यक्त केला आहे. एखाद्या वेळी श्रीकृष्णाच्या गवळीपणाचे स्वरूप सांगताना

वेणु वाहुनि सावळा, गाई चारिसी गोपाळा॥
कां वा न येसी धांवत, विठ्ठल माझें कुळदैवत॥
अंगीं चंदनाची उटी, पदक मिरवलें कंठीं॥
गळां माळ वैजयंती, सुदर्शन घेऊनि हातीं॥
कांसे पितांबर शेला, विटेवरलिया विठ्ठला॥

असे देवाच्या अंगावरचे शोभणारे सौंदर्य वर्णन करतात. क्वचित प्रसंगी केवळ 'विठ्ठल अमुचा प्रचंड' अशा वरवर साध्या पण आशयाने भरगच्च प्रतिभेचा उपयोग करतात.

त्यांच्या कवितेतील भावसृष्टी भक्तीच्या पातळीवरची आहे हे जरी खरे असले तरी भक्तीच्या अन्य छटाही क्वचित रंगतदार आहेत. बालक्रीडेतील किंवा श्रीकृष्ण महात्म्यातील अनेक शब्दचित्रे तर बहारदार उतरली आहेत. त्यात विनोद व वात्सल्य यांचे रेखाटन आढळते. मृगांची शिंगे पकडून धावणारे; मांजरांचे पुच्छ व मान पकडून चेष्टा करणारे कृष्ण बळिराम; त्यांच्या क्रीडेने मुक्तपणे हंसणारी यशोदा व इतर माणसे; माकडाचे दोन्ही कान पकडून

(पान ५४ वर)



# 'लय-योगी' बा. भ. बोरकर

—प्रभाकर अत्रे

**सुप्रसिद्ध कविवर्य बा. भ. बोरकर यांना महाबळेश्वर येथील विभागीय साहित्य संमेलनाचे आणि खार येथे नुकत्याच झालेल्या मुंबई व उपनगर साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन साहित्यिकांनी त्यांचा उचित असा सन्मान केला आहे. आणखीही एक सन्मानपद त्यांना मिळणार असून त्यांच्या मस्तकावर तिहेरी सन्मानाचा मुकुट विराजत आहे. श्री. बोरकर आणि 'दीपावली' यांचे प्रथमपासूनचे घनिष्ट संबंध सर्वश्रुत आहेतच. तेव्हा आम्हीही या क्रिकेटविषयक खास अंकाला उचित अशा 'हॅटट्रिक'बद्दल श्री. बा. भ. बोरकर यांना हे सन्मानपुष्प अर्पण करीत आहो**—संपादक

"सौन्दर्याचे काव्य" असं मराठीतील एका नामवंत कवीने कवितेच्या संदर्भात म्हटलं आहे. सृष्टीच्या अंगांगात, अणुपरिमाणूत, माणसाच्या हास्यात आणि अश्रूत, त्याच्या श्वासात आणि ध्यासात, त्याच्या जीवनात आणि प्रसंगी त्याच्या मरणातही जे काव्य दडलेले आहे ते पाहण्यासाठी कवीची दृष्टि पाहिजे. कवीचं मन पाहिजे, कवीची सुजाणता आणि संस्कारक्षमता पाहिजे. तरलता, सौंदर्यवेधी आणि सौन्दर्यवेडी दृष्टि पाहिजे, योग्याची साधना आणि योग्याची स्थितप्रज्ञ वृत्ती पाहिजे. 'ब्रह्मानंदी टाळी लागणें' हा जो प्रकार आहे तो व्हायला हवा म्हणजे मग कविवर्य केशवसूत म्हणतात त्याप्रमाणे 'वस्तुवस्तुषु' भरलेले सौंदर्य भावते आणि त्या सौंदर्याशी नाते जडले की शब्द जे सुंदर रूप घेतात त्याला लोक कविता म्हणून संबोधतात.

कवितेच्या बाबतीतला हा लय–योग, समाधी योग आणि सौंदर्य-योग ज्यांना साधला आहे आणि ज्यांची अवघी कविताच नव्हे तर ज्यांचे अवघे जीवनच 'ब्रह्मानंदी' टाळी लागण्यासारखे काव्यात्म, रसज्ञ झाले आहे अशा कवीत महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कवि **बा. भ. बोरकर** यांचा समावेश होतो.

कविवर्य बा. भ. बोरकर ह्यांच्या व्यक्तित्वाला व कवित्वालाही अनेक स्तर असल्याचे बाह्यतः जाणवत असले तरी ते व्यक्तित्व 'एकात्म' असेच आहे आणि त्या एकात्म व्यक्तित्वाच्या पाकळी पाकळीवर व मातीच्या प्रत्येक कणाकणावर एकच शब्द कोरलेला आहे–सौंदर्य!! बोरकरांच्या कवितेला जसे सौंदर्याचे वेड आहे तसेच त्यांच्या व्यक्तित्वाला सौंदर्याचा ध्यास आहे. आणि ह्या वेडापायी आणि ध्यासामुळेच साठीतही बोरकर व बोरकरांची कविता चिरनव, चिरतरुण, सौंदर्यवेडी व सौंदर्यवेधीच राहिलेली आहे. आणि सौंदर्याचा असीम अनुभव घ्यायलाही साधुत्वाच्या समकक्षेत जाण्याची तयारी सौंदर्य साधकाला असावी लागते. कविवर्य तांबे यांना ती साधली होती. आणि म्हणूनच तांब्यांची कविता सौंदर्य आणि साधुत्व (वा मांगल्य) यांचे उद्गान व जयगानही करीत राहिली. बोरकरांनीच मागे एका ठिकाणी म्हटलं की, "कविवर्य तांबे यांची थाप पाठीवर पडली आणि मी धन्य झालो." तांबेपरंपरेचे असून, ती परंपरा वर्धिष्णु करणाऱ्या कवीत बोरकरांचा समावेश होतो. आणि तांबे-बोरकरांचा समानधर्म हा जीवनातल्या सौंदर्यावर आणि साधुत्वावर वा मांगल्यावर पोसलेला आहे. हे सौंदर्य अनेक रूपे घेऊन तांब्यांच्या कवितेत ज्याप्रमाणे अभिव्यक्त झालेले दिसते तसेच ते बोरकरांच्या कवितेतही जाणवते आणि बोरकरांच्या व्यक्तित्वात आणि कवितेत व्यक्त होणारे हे सौंदर्य केवळ इंद्रियगर्भ नाही तर ते भावगर्भही आहे. बोरकरांची कविता काव्यविषयक श्रद्धा आणि जीवनविषयक श्रद्धा यांच्या संगमातून जे सौंदर्य आकार घेते त्याचा शोध घेत आली आहे, त्याचा आविष्कार करीत आली आहे. 'कवी हा जन्मावाच लागतो' हे विधान जर आपण मान्य करणार असू तर बोरकर हे कवि म्हणूनच जन्माला आले आहेत असे वाटते–नव्हे पटते! त्यांच्या लहानपणचा एक अनुभव सांगताना तेच असं म्हणाले की, काव्य 'करतात' 'लिहितात' असं मला ठाऊकच नव्हतं. त्याबद्दल मला जाणीवही नव्हती. आमच्या घरात पदे, अभंग ह्यांचं एक वातावरण होतं. रोजच्या भजनात काही अभंग व पदे ठरलेल्या क्रमाने म्हटली









अनुक्रमणिका

जात. त्यानंतर आम्हा मुलांना एखादा नवा अभंग वा पद म्हणावं लागे. एक दिवस मी ते विसरलो—मग मी स्वतःच एक अभंग रचिला. आणि तोच त्या दिवशी म्हणून दाखविला. घरातल्या माणसांनीही योग्य ती साथ दिली. शेवटी 'बाकी म्हणे' (बोरकरांना त्यांचे स्नेही-सहकारी 'बाकीबाव' म्हणूनच अधिक ओळखतात) आल्यावर मात्र सारी माणसे गडबडली. भजन संपल्यावर काकांनी मला बोलावून घेतले. म्हणाले, "संतांच्या अभंगात आपले नाव घुसडू नये". आजी म्हणाली, "संत झाल्याशिवाय अभंग करायचा नसतो."

ह्या उदाहरणावरून एक गोष्ट स्पष्टपणे दिसते आणि ती अशी की, बोरकर हे जन्माने वृत्तीने अंतर्बाह्य कवि आहेत. त्यांच्या अंगांगातून वीज खेळवून गेलेला आणि त्यांच्या व्यक्तित्वाला मोहरून टाकणारा, शालेय जीवनातला प्रसंग असो, पणजी सचिवालयातून बाहेर पडल्याबरोबर त्याच फुटपाथवर दिसलेली सुंदर ख्रिश्चन तरुणी असो, 'जपानी रमलाची रात्र'चा भावानुभव सांगत असोत वा 'घन बरसे रे' ही कविता कशी झाली ते सांगत असोत. भीमसेन जोशांच्या गाण्याची लकेर कानावरून जावो—बोरकरातला सौंदर्यवेडा कवि चटकन हरवतो—त्या अनुभवविश्वात बुडून जातो. बोरकरांनाही तांब्यांप्रमाणेच संगीताचे वेड आहे आणि त्यांच्या सौंदर्यवेडात रूप, रंग, रस, गंधादि सौंदर्यांप्रमाणेच सूर, ताल, लय, शब्द आणि शब्दांतर्गत विविध सौंदर्ये यांचाही समावेश होतो. 'जीवनसंगीत'ची पहिली आवृत्ती जेव्हा प्रसिद्ध झाली तेव्हा तीत तांब्यांप्रमाणेच राग—ताल वगैरे नमूद करण्यात आले होते. आजही कविता गाऊन दाखविणे त्यांना आवडते. पटतेही. बोरकर जसे सुरात हरवतात, तसेच ते रंगातही हरवतात. उत्तम चित्रे ते नुसते पहात नाहीत. ते स्वतः चांगले चित्रकारही आहेत. आणि घरी गेलात तर त्यांनीच केलेले आपल्या पत्नीचे पोर्ट्रेट पाहून लेखणीप्रमाणेच बोरकरांजवळ सुरेख कुंचला आहे याची ग्वाही तुम्हीच द्याल. गोव्याच्या निसर्गातच एक प्रकारचे चैतन्य आहे. वीज आहे. आणि भारावून टाकणारी मादकताही आहे. गोव्यांवर चारशे वर्षांहूनही अधिक काळ पोर्तुगीजांचे राज्य होते. ख्रिस्तीकरणाचे शासकीय प्रयत्नही खूपच झाले. आणि तरीही गोमंतकाने भाषा, संस्कृति, परंपरा राखल्या आहेत. याचे एक कारण मला असे वाटते की, गोमंतकात देव, धर्म, संस्कृति, संत परंपरा यांच्याबद्दल काही अंगभूत श्रद्धा असल्या पाहिजेत. आघातात अखेर साथ करतात, सावध करतात, जगवितात त्या श्रद्धाच! बोरकर यांच्या व्यक्तित्वाचे रसायन हे गोव्यातला बेधुंद करणारा सजीव निसर्ग आणि संतवाणीचे लहानपणापासून लाभलेले संस्कार यातून तयार झाले असावे. बोरकरांनी बालकवींची, तांब्यांची परंपरा केवळ जपली—वाढविली नाही तर स्वतःचा ठसा उमटवणारी आणि मराठी कवितेतले 'आपले आगळेपण' ठसवील अशी कितीतरी कविता लिहिली. बोरकरांचा निसर्ग हा बालकवींच्या निसर्गापेक्षा वेगळा आहे. तांब्यांची प्रीती कविता आणि बोरकरांची प्रीती कविताही वेगळी आहे. बोरकरांची कविता अधिक 'बोल्ड' आहे, अधिक धुंदीमस्ती त्यालेली आहे. तिची स्वतःची शब्दकळाही वेगळी आहे; परंतु एकेकाळी ह्या 'शब्दकळे'नेही बोरकरांच्या कवितेचे आगळेपण मनावर ठसत असे. पण साहित्यनिर्मितीची प्रक्रियाच मुळात एक सजीव प्रक्रिया असल्याने जसा कवि-लेखक वाढतो, त्यांचे व्यक्तित्व बहरते—मोहरते तसे ते मोहरणे त्याच्या शब्द-फुलातून जाणवते. भावगंधातून वाचकही मोहरत जातो. बोरकर यांची कविता नव्या-जुन्या-छोटयामोठया साऱ्या कवितांच्या संसारात आजही मानसन्मानाने टिकून आहे याचे कारण ती कवीच्या व्यक्तित्वाबरोबरच बहरत-मोहरत गेली आहे. रंग, रूप, रस, गंध आणि शब्दकळेतच ती अडकली नाही तर अनुभवघन व भाव घन होत गेली. तीही वाढली आणि जन्मजात कवि जेव्हा काव्य 'योग' मानून त्याची साधना करतो तेव्हा त्या साधनेने प्रज्ञा वाढते, प्रतिभा पल्लवित होत जाते. बोरकर साठीतही तरुण आहेत आणि त्यांची कविता साधना चाळीस वर्षांहून अधिक काळ चालू असूनही त्यांच्या कवितेलाही मालिन्य वा शैथिल्य आले नाही!

ह्याचे आणखीही एक कारण आहे आणि ते मला फार महत्त्वाचे वाटते. बोरकरांची अलिकडची दोन अध्यक्षीय भाषणे जर आपण बारकाईने वाचली तर त्यातच ह्या

(पान ५५ वर)



याद रखो ‥र लोग याद रखो, १९७२ साल आ रहा है!










अनुक्रमणिका




"मग संपलंच म्हणायचं. तुम्ही त्यांना काही तरी बोलाल अन् मग ते सरळ तुम्हाला फरासखान्याची हवा दाखवतील."

"एवढंच ना! मग होऊन जाऊदे एकदा सोक्षमोक्ष काय तो!"

"जशी तुमची मर्जी. सांगते त्यांना तुमची इच्छा!"

"बरं! पान खाणार जहानआरा?"

"खरं म्हटलं तर मीच तुम्हाला पान द्यायचं. पण आमच्या महालात ते शक्य नाही."

"मग इथं दे करून!"

"खरंच देऊ?"

"दे. तुझ्या हातचं पान खायला शिकंदर नशीबच हवं जहानआरा."

"काहीतरी भकताय झालं. माझ्या हातचं पान खाणारे एक अब्बाजान अन् आता दुसरे तुम्ही."

अख्तर तिच्या लुसलुशीत हातातलं पान घेत बोलला–

"पान करताना तुला पहाण्यात फार मजा आली. मी चितारी असतो तर तुझं चित्र पान करतानाच काढलं असतं."

तिनं त्याच्या हातात पान दिलं तेव्हा अख्तर पुन्हा बोलला–

"तोंडात घाल ना?"

"छी. छी. तुम्हीच घाला."

"लाजतेयस्? तुला हिंदु संस्कृती माहितीय्?"

"नाही. सांगा कशी आहे ती?"

"तुझा भाऊ दारा एवढा हिंदु धर्म पढलेला! त्यानं नाही तुला सांगितली ती?"

"नाही. सांगा तुम्ही!"

"अग हिंदु लोकात पान ही स्त्री पुरुषांच्या प्रेमाची निषाणी असते!"

"म्हणजे? मी नाही समजले?"

"त्यांच्यात पानाला विडा म्हणतात. मिया-बिबीचा विडा रंगला तर त्यांच्या मोहबतीचं ते प्रतीक मानतात!"

"पण तुमचं तोंड तर अजिबात रंगलं नाही. माझ्यावर असलेली तुमची मोहबत खोटी का?"

"माझं पान कधीच रंगत नाही जहानआरा."



अनुक्रमणिका

"आमच्या घरचं पान खा एकदा. मग पहा कसं मुहू रंगेल ते."

"मग आणता एकदा करून!"

"आणीन. शादी तर पक्की होऊ दे. मग अब्बाजानना काय सांगू?"

"मला भेटायचंय त्यांना असं सांग."

"कशासाठी असं विचारलं तर?"

"माझ्या जिंदगीच्या फैसल्यासाठी म्हणून सांग."

"पाहते प्रयत्न करून."

जहानआरा बुरखा तोंडावर टाकून निघाली. दोघांचं सगळं भाषण हेरदासीनं ऐकलं होतं अन् ते बादशहाला कळणार होतं. जहानआराला त्याचा पत्ताही नव्हता.

बादशहा खाना उरकून महालात बसला होता अन् जहानआरा त्याला पान करून देत होती. पान तोंडात घालीत बादशहा बोलला—

"आणखी कुणा कुणाला पान देतेस बेटी?"

"छी. छी. काय घाणेरडं बोलताय अब्बाजान."

"असू दे. पण खरं आहे ना ते?"

"काय खरं आहे?"

"अख्तरला तू पान दिलंस ते!"

"तुम्हाला कसं कळलं?"

"सगळ्या गोष्टी माझ्या कानावर येतात बेटी. हं! मग काय म्हणतोय अख्तर?"

"त्यांना भेटायचंय तुम्हांला!"

"मतलब?"

"त्यांना काही तरी विचारायचंय?

"शादीबाबत ना? मग मुलाखतीची जरूर नाही."

"अब्बाजान, तुम्ही स्वतःला हिंदुस्थानचे बादशहा म्हणविता अन् एखाद्याला साधी भेटही देत नाही याला काय म्हणायचं? अकबर बादशहांच्या वेळचा जमाना विसरलात वाटतं?"

"बरी याद काढलीस माझ्या आजोबांची. पण त्यांनीही माझ्या वडिलांना अनारकलीशी शादी करू दिली नाही त्याची याद असू दे म्हटलं."

## —दिवाळी अंकात प्रसिद्ध झालेल्या कथेचा उत्तरार्ध—

**पूर्व कथासूत्र :**

**शहाजहान बादशहाची कन्या जहानआरा हिचे लग्नाचे वय उलटले तरी बादशहाने तिच्या लग्नाबद्दल काहीच हालचाल केली नाही. बुलंद अख्तर नावाचा धाडसी तरुण भर दरबारात शहाजहानला भेटला आणि त्याने त्याच्या बेटीची शादीसाठी मागणी केली. खरे म्हणजे त्याची गर्दनच छाटली जायची पण जहानआराच्या रदबदलीने तो वाचला. पुढे बादशहाची बेटी व बुलंद अख्तर यांच्या चोरट्या भेटी वाढू लागल्या. पण हा चोरटा व्यवहार अख्तरला असह्य होत होता. त्याने आपल्या प्रेयसीला सांगितले की बादशहाशी माझी एकदा मुलाखत घडवून आण .... त्यानंतरचा कथाभाग येथे दिला आहे.**

"जरूर आहे. पण अनारकली ही त्यांच्याच कबिल्यातली होती म्हणून त्यांनी विरोध केला ही गोष्ट तुम्ही विसरलात. मी आपली बेटी आहे त्याचा विसर पडू देऊ नका म्हणजे झालं."

"जहानआरा बोलण्यात तू भारी हुशार आहेस. मुलगा असतीस तर तुलाच मी बादशहा केलं असतं."

"तसं असतं तर माझी निदान शादी तरी झाली असती."

"बोलण्यात तू मला नेहमीच हरवतेस बेटी. बोल तुझं काय म्हणणं आहे?

### अरविंद ताटके

"अख्तरची एवढी इच्छा आहे तर द्या त्याला मुलाखत!"

"होऊ दे तुझ्या मनासारखं. मलाही त्याला एकदा खडसावायचंय. येऊ दे त्याला संध्याकाळी."

ऊन्हं कलली होती अन् शहाजहान चांदीच्या कुंचल्यानं दांत कोरीत बसला होता. त्याचे डोळे ताजमहालकडं रोखलेले होते. अख्तर त्याच्या पुढ्यात येऊन उभा राहिला तरी त्याचं लक्ष नव्हतं. कुंचला खाली पडला तेव्हा तो उचलण्यासाठी बादशहा वाकला तेव्हा अख्तर त्याच्या नजरेस पडला. घुश्शातच शहाजहान बोलला,

"झाली एवढी शिक्षा पुरी झाली नाही वाटतं अख्तर."

"हातात सत्ता आहे म्हणूनच शिक्षा दिलीत जहाँपन्हा!"

"खाजगी गोष्टी तू दरबारात बोलाव्यास अन् आम्ही त्या निमूटपणी ऐकाव्यात असं तुला म्हणायचंय?"

"शिक्षा देण्याची हौस फेडून घेतलीतच आपण. पण त्यानं सवाल सुटला नाही जहाँपन्हां!"

"बोल तुझा सवाल!"

"आपल्या बेटीवर माझी मोहबत आहे अन् मला तिच्याशी शादी करायचीय!"

"त्याचं उत्तर मी तुला मागेच दिलंय अख्तर."

"तेव्हा मागणी होती पण मोहबत नव्हती."

"आता विशेष काय घडलंय?"

"जिची मागणी केली होती तिचाही शादीसाठी रुकार मिळालाय आता."

"कोणाबद्दल बोलतोयस् तू?"

"आपली बेटी जहानआरा हिच्याबद्दल!"

"ती तयार आहे तुझ्याशी शादी करायला?"

"हो."

"तुला कसं कळलं ते?"

"आमच्या भेटीत कळलं!"

"चोरून भेटी घेण्यात शरम नाही वाटत तुला?"

"पहिली भेट आपल्या बेटीनंच घेतली जहाँपन्हा!"

शहाजहान थोडा नरमला अन् मग पुन्हा रागात बोलला—"मग मी काय करावं असं तुझं म्हणणं आहे?"

"आमच्या शादीला संमती द्यावी."

"ती गोष्ट कालत्रयी घडणार नाही."

"कारण?"








"तुला जहानआरानं नाही सांगितलं ?"

"मला आपल्याकडून ऐकायचंय जहाँपन्हा !"

"ही हिंमत ! ऐक तर मग. तुझ्यासारख्या भणंगाशी तिची शादी व्हावी असं मला नाही वाटत."

"दुसऱ्या कुणाशी तरी तिची शादी का नाही लावलीत ?"

"माझ्या संकटात मला जहानआराशिवाय दुसरी कुणाची सोबत होणार नाही याची खात्री असल्यानं तिनं शादीशिवाय रहावं असंच मला वाटतं."

"आपल्याला कसली आलीयत संकटं ?"

"ते बादशहा झाल्याशिवाय कळायचं नाही तुला !"

"आपण गादी बळकावताना जी पापं केलीत त्याबद्दल प्रायश्चित्त आपल्याला मिळेल तेव्हा त्या दुःखाच्या वेळी जहानआरा हीच आपल्या सौख्याची ठेव असेल असं का मी समजायचं ?"

"अख्तर ! तू काही समज. मला जास्त वेळ नाही. तुला आणखी काही सांगायचंय ?"

"किती खुनशी अन् स्वार्थी आहात जहाँपन्हा. कुठं तुमचे आजोबा अकबर बादशहा अन् तुम्ही. सावत्र आईवर देखील तुम्ही लुब्ध झालात. नूरजहाननंच नकार दिला म्हणून ! नाहीतर तुम्ही तुमच्या सापत्न माँशीदेखील शादी केली असतीत. बुढे झालात तरी अजूनही तुमच्या शृंगाराला बरबंद नाही अन् तुमच्या छोकरीनं मात्र सारी जिंदगी तुमची सेवा करण्यात फुकट घालवावी असं तुम्हाला वाटतं ! बेटीवरची तुमची मोहबत अजब आहे. सारी दुनियां थुंकतेय तुमच्या या स्वार्थी प्रेमावर."

"अख्तर, फार बोललास. जग माझ्यावर थुंकतेय ही गोष्ट खरी; पण त्याचं कारण म्हणजे तुमच्या होत असलेल्या चोरट्या भेटी. आता त्या बंद करणं मला भाग आहे. तुझी रवानगी देखील आता सरळ कैदखान्यातच होणार आहे. कोण आहे रे तिकडे ? घेऊन जा या माथेफिरूला अन् ठेवा फरासखान्यात बेडी घालून !"

"जहाँपन्हा ! मोहबतीपायी ही शिक्षा मी खुषीनं पत्करीन; पण तुमच्या तकदीरातही ही कैदच शेवटी ठेवलेली आहे. औरंगजेबच तुम्हाला कोठडीत ठेवील तेव्हाच तुम्हाला आपल्या बेटीची जिंदगी बरबाद केल्याचा पश्चात्ताप होईल."

बुलंद अख्तरला कैदखान्याकडे नेताना बुरख्यातून दोन डोळे त्याच्यावर रोखले होते; पण त्या नजरेत कारुण्य साठविलेलं होतं. जहानआरा हमसाहमशी रडत होती. बुरखा दूर झाला होता. तेव्हा अख्तर जेलखान्यात बंद झाला होता.

बादशहाची खान्याची तयारी झाली होती. त्याचं ताट रसोईखान्यात वाढलं होतं. प्रथम त्याच्या ताटातला प्रत्येक पदार्थ जहानआरानं चाखून पाहिला. पित्यावर विषप्रयोग होऊ नये म्हणून ती दक्षता घेत असे. अख्तरकडेही ती एक ताट पाठवी. त्याचं अन्नही ती चव घेऊन पाही. अख्तरच्या बाबतीत तिचा बापावरही भरवंसा नव्हता. शहाजहान विषप्रयोगानं अख्तरला अल्लाकडं धाडण्यास कमी करणार नाही याचीही तिला खात्री होती. पण शहाजहान तिच्या बारशाला जेवला होता. त्याचा सारा जन्मच मुळी कपटकारस्थानात गेला. अख्तर तुरुंगात गेल्यापासनं त्यानं आपल्या लाडक्या बेटीवर सक्त नजर ठेवली होती. अगदी तिच्या नकळत. तिच्या सगळ्या हालचालींची खडान्खडा बातमी त्याला असे. जहानआराला त्याचा पत्ताही नव्हता.

जहानआरानं पान केलं अन् शहाजहानच्या हातात दिलं. तो खुषीत असल्यानं पाहून तिनं विचारलं "अब्बाजान एक विचारू ?"

"विचार बेटी !"

"अख्तरला पान धाडू ?"

"तो कैदी आहे बेटी !"

"म्हणून काय झालं ? पान धाडलं तर तेवढीच त्याची चैन."

"लोकापवादात ही गोष्ट बरी नाही दिसणार बेटी !"

"मी अजून कुवार आहे ही गोष्ट तरी कुठं बरी दिसतेय दुनियेत ?"

"पाठव हवं तर ! पण एक शर्त पाळली पाहिजे."

"सांगा."

"पान दासी घेऊन जाईल. तुला नाही जाता येणार !"

"मी आत नाही जाणार ! फक्त कोठडीजवळ थांबेन. दासी आत जाऊन पान देईल !"

"होऊ दे तसं."

शहाजहानचे डोळे कारस्थानानं चमकू लागले. डोक्यात सारं कापटच जमा झालं अन् तो जहानआराला बोलला—

"बेटी, माझ्या झोपण्याच्या खोलीत जरा जा अन् माझं कलमदान घेऊन ये. मला एक तातडीचा खलीता रवाना करायचाय. नंतर हवं तर पान कर अख्तरचं."

जहानआरा उठली अन् कलमदान आणण्यासाठी दुसऱ्या महालात गेली. शहाजहानच्या मुद्रेवर आसुरी आनंद झळकत होता. त्याचा चेहरा क्रौर्यानं भरून गेला. हेरदासीला त्यानं इशारत केली. ती जवळ आल्यावर क्षणभर तो तिच्याशी कुजबुजला. तेवढ्यात जहानआरा आलीही. शहाजहानची मुद्रा पुन्हा पालटली अन् मग तो तिला बोलला——

"आणलंस कलमदान बेटी ? आता कर पान अन् दे दासीजवळ."

"अब्बाजान, मी कोठडीपर्यंत जाणार आहे. तिथंच तिला पान देईन."

"जशी तुझी मर्जी."

कोठडीत अख्तर बसला होता एका खाटेवर. नुकताच त्याचा खाना आटपला होता. कुणाची हाक ऐकू आली म्हणून तो दरवाज्यापाशी आला. तो त्याला बुरख्यातली जहानआरा दिसली. हळूच ती त्याला भरल्या आवाजात बोलली——

"अख्तर अखेरीस तुमच्या तकदीरात कैद आली !"

"अल्लाची तशीच इच्छा असेल जहानआरा !"

"खाना झाला अख्तर ?"

"आत्ताच ! तू का आलीस जहानआरा ?"

(पान २८ वर पहा)

# अ-पूर्व जर्मनी



ह. सी. उर्सेकर

ॲडिशनल चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट

...हॅम्बर्गचा चारशे फूट उंचीचा टेलीव्हिजन टॉवर म्हणजे आकाशात खुपसलेला दांडपट्टाच जणू... त्या प्रकाशवाणी मनोऱ्यावरील हॉटेलात लंच घेता घेता काचेच्या बुरुजातून उंचउंच इमारती दिसत होत्या... पण थोड्यावेळाने पाहतो तो इमारतींच्या जागी हिरवळ दिसली... हा ट्रॅन्फरसीन कसा झाला?...

कोपनहेगन् आज सकाळी १०.२५ वाजता सोडले. गेले तीन दिवस स्टॉकहोम, ऑस्लो, कोपनहेगन् या स्कँडेनेव्हीयन राजनगरींचे धावते दर्शन एकेक दिवसात घेतले. आता पश्चिम जर्मनीचा परिचय करून घ्यायचा होता. 'लुफ्तहंसा' या पश्चिम जर्मनीचे विमान कंपनीच्या विमानाने युरोपीय गोकुळास रामराम ठोकला! लुफ्तहंसा काय गोड नाव. लुफ्त म्हणजे हवा हा जर्मन शब्द. तर हंसा म्हणजे आपला हंस संस्कृत शब्द! संस्कृत भाषेचे व वाङ्मयाचे जर्मन लोकांना किती आकर्षण आहे त्याचा हा पुरावा! जर्मनीला वेदांचे दुसरे माहेरघर म्हणतात ते उगाच नव्हे. कारण जर्मनी म्हणजे वैदिक संशोधनाची काशी! त्या देशाला जायला सर्वात मोठी ओढ मला लावणारे कारण ते हे!

हेलसिंकीहून युरोपच्या दक्षिणेकडे प्रवास होत होता. कोपनहेगन्च्या दक्षिणेस कोलनच्या विमानतळावर ११-३५ ला उतरलो. कोलन रोमांचकारी ऱ्हाईन नदीवर वसले आहे. भारतात गंगेला जे महत्त्व तेच जर्मनीत ऱ्हाईनला. ऱ्हाईनखोरे फार निसर्गरम्य आहे. जगप्रसिद्ध कोलनवॉटरचा उद्‌गम येथलाच. मला वाटले गंगेत गडू बुडवून आपण काशीचे गंगोदक आणतो तसेच कोलनमधील ऱ्हाईनच्या पात्रातील पाण्यात वाटल्या बुडवून तेच कोलनवॉटर म्हणून विकत असावेत! पण जर्मन काम इतके स्वस्त आणि सोपे नाही.

कोलन विमानतळावरून हॉटेलवर न जाता सरळ डाइशेवेले म्हणजे जर्मनीचा आवाज या नावाचे जगविख्यात आकाशवाणीचे स्टेशन आहे तेथे गेलो. त्यातील निरनिराळे स्टुडिओ पाहिले. विज्ञानाच्या परिपूर्णतेचे ते प्रात्यक्षिकच होते. रेडिओ-वक्त्याला किंवा गायकाला मधेच खोकला आला तर त्याच्यासमोरील बटनाला त्याने हळुवार स्पर्श करताच खोकला स्टुडिओबाहेर जाण्याचे बंद! खोकला संपला, पुन्हा बटन-स्पर्श-की ध्वनीप्रक्षेपण सुरू! उतारवयात बालगंधर्वांना गाताना असाच खोकल्याचा त्रास होई, तेव्हा अशी यंत्रणा असती तर, संगीतातला विसंवाद गाळून टाकता आला असता आणि उरले असते सुरांचे निर्मल सुवर्ण!

## जर्मन आकाशवाणीवर संस्कृत कार्यक्रम

या पश्चिम जर्मनी रेडिओवर जगातील प्रमुख २१ भाषांत रोज ८२ कार्यक्रम ध्वनीक्षेपित केले जातात. विशेष म्हणजे दर पंधरवड्यातून एकदा संस्कृत भाषेतूनही कार्यक्रम होतो. संस्कृत विभागाच्या प्रमुख सौ. सुषमा लोहिया ह्या डॉ. रघुवीर यांच्या कन्या होत. तेथील चालकांनी जुन्या संस्कृत ब्रॉडकास्टची हस्तलिखिते मला दाखविली. हा विभाग फार लोकप्रिय असल्याचे ऐकून मला अर्थातच एक आर्यन आनंद झाला. हिन्दी विभागात कक्कर व अग्रवाला भेटले. अग्रवाला पूर्वी रणजीत स्टुडिओत ध्वनी-

प्रमुख होते. त्यांनी मला हिंदी फिल्मी गाणी म्हणून दाखविली. संगीत हे संस्कृतीचे सर्वगामी उपांग आहे हेच खरे!

स्टुडिओचे एक अधिकारी श्री. शेफर यांनी स्वतःचा परिचय 'बॉम्बेवाला' म्हणून करून दिला. ते ४० वर्षे मुंबईत वृत्तपत्र व्यवसायात होते. हे गृहस्थ ठेंगणेठुसके, लालबुंद, बोलण्यात अत्यंत विनोद-चतुर! मुंबईची स्मृतिचित्रे त्यांनी रेखीव शब्दात रेखाटून पुनःप्रत्ययाचा आनंद लुटला! त्यांनी सांगितले, युरोपातील लोकमताचा कौल घेतला त्यात हॉलंडची आकाशवाणी सर्वात अधिक लोकप्रिय ठरली. त्या खालोखाल बी. बी. सी. आणि तिसरा नंबर डाइशेवेलेचा!

काव्य-कथांनी भुकेची व्यथा नष्ट होत नाही, तेव्हा स्टुडिओस रामराम ठोकून एका हॉटेलात जाऊन लंच घेतले. गरम गरम भात व तिखट तिखट सूप—म्हणजे आपली आमटी म्हणा! हिंदुस्थान सोडल्यापासून आज प्रथमच असे अन्न मिळाल्याने आजचे लंच उल्लेखनीय वाटले!

नंतर इन्सोल हॉटेलात मुक्काम. पवित्र शहर — कोलनला उत्तरेकडील रोम म्हणतात. कारण तेथे अनेक उत्तमोत्तम चर्चेस आहेत. त्यातील गगनचुंबी कोलन कॅथिड्रल गॉथिक वास्तुशास्त्राचा अजब नमुना आहे. मुंबई युनिव्हर्सिटीचा राजाबाई टॉवर या गॉथिक साच्याचाच आहे. उंचच उंच, चिंचोळे पाचशे फूट उंचीचे दोन मनोरे मुख्य प्रवेशद्वाराच्या पार्श्वभागी जयविजयासारखे शोभतात. स्वर्गातील परमेश्वराशी सख्य करण्याच्या मानवाच्या दैवी महत्त्वाकांक्षेचे प्रतीक म्हणजे हे दोन मनोरे! उच्च वास्तु उच्च विचारांना स्फूर्ती देते हे उत्तुंग सत्य आहे.

दुसऱ्या दिवशी सकाळी कोलनहून बॉनला मोटरने गेलो. ऱ्हाईन नदीकाठचा हा प्रवास अति निसर्गरमणीय भागातून झाला; पण मोटार १४० कि मी. वेगाने पळत होती, त्यामुळे सर्व सिनसिनेरी म्हणजे निसटती निमिष-चित्रेच ठरली.

## समाज आणि रंगभूमि

**जुन्या पिढीतील ख्यातनाम चरित्र अभिनेते नटवर्य श्री. केशवराव दाते यानी नुकताच ८२ वर्षांचा पल्ला गाठला आहे. तरी त्यांचा उत्साह तरुणानीही हेवा करण्याजोगा आहे. त्यानी आपली उभी हयात रंगभूमीची निरलसपणे सेवा करण्यात वेचली आहे. अशा या सिद्धहस्त कलाकाराच्या व्यासंगी, चोखंदळ व अष्टपैलू अनुभवांची गाथा त्यांच्याच शब्दात सांगितलेली 'दीपावली'च्या जानेवारीच्या अंकापासून क्रमशः सादर करण्यात आम्हाला आनंद होत आहे. सादरकर्ते आहेत......**

**श्री. लक्ष्मीदास बोरकर**

पंचवीस किलोमीटर अंतर कापून आमची फोक्सवॅगन—पश्चिम जर्मनीतील अत्यंत लोकप्रिय मॉडेल—बॉनला केव्हा पोचली कळलेही नाही. बॉन ही पश्चिम जर्मनीची राजधानी. बेल्जीयमच्या शेजारी ऱ्हाईनच्या तीरी वसली आहे. वाटेत जगप्रसिद्ध संगीतकार बीथोव्हॅन याचा पुतळा पाहिला. मिल्टन कवी अखेर आंधळा झाला तसा संगीतज्ञ बीथोव्हॅन बहिरा झाला. पण या दोषामुळे त्याची एकाग्रता वाढली आणि त्याने भव्य नवव्या सिंफनीची रचना केली. हा प्रेक्षकांकडे पाठ करून ऑर्केस्ट्राचे दिग्दर्शन करताना प्रेक्षकांनी प्रचंड टाळ्या वाजवल्या पण त्याला काही ऐकू गेले नाही.

बॉन विश्वविद्यालयाची इमारत पाहिली. फार स्फूर्तीदायक अशी ती वास्तू आहे. या शिक्षणसंस्थेतच जर्मनीतील प्राच्यविद्येच्या अभ्यासाचा पाया घातला गेला. १८१८ मध्ये प्राच्यविद्येचे अध्यासन निर्माण करण्यात आले. प्रा. श्शेगेल यांनी वेदविद्येच्या विद्यापीठीय अभ्यासाचा पाया घातला.

### न्यायासनामागे लाकडी क्रूस

सकाळी ठीक दहा वाजता बॉनच्या फौजदारी कोर्टात गेलो. इमारत फार प्रचंड नीटनेटकी, स्वच्छ होती. आपल्याप्रमाणे गडबड, वजबज मुळीच दिसली नाही. सर्वांचेच व्यवस्थित पोषाख. त्यामुळे गुन्हेगार कोण, वकील कोण व कोण साक्षीदार यांचा बोध कोर्टहॉलमध्ये जाईपर्यंत झाला नाही. उन्हाळ्याची सुटी असल्याने दिवाणी न्यायालय बंद होते. प्रथम लँडर कोर्टाचे न्यायाधीश श्री. कोकरलिंग यांच्या चेंबरमध्ये जाऊन भेट घेतली. हे सेशन जज्ज आहेत. त्यांचे चेंबर वातानुकूलीत होते. दुभाषाच्या मदतीने जर्मन न्यायसंस्थेबद्दल त्यांच्याशी चर्चा केली.

पश्चिम जर्मनीच्या संघराज्याची हॅम्बुर्ग, बव्हेरीया वगैरे अकरा राज्ये आहेत. संघराज्याचे सर्वोच्च न्यायालय आहे. त्या खाली प्रत्येक राज्याचे लँडर कोर्ट म्हणजे आपलेकडील हायकोर्ट आहे म्हणा. कोर्टात गेलो. तेथे सर्व काम मोठ्या रुबाबात, संथपणे चाललेले दिसले. आरडा-ओरडा मुळीच नव्हता. न्यायासनामागे लाकडी क्रूस होता. मानवी न्यायास ईश्वरी अधिष्ठान!

लंच आटोपल्यावर दुपारी तीन वाजता पश्चिम जर्मनीचे न्यायमंत्री श्री. कोशमन यांची भेट घेतली. हे पूर्वी हॅम्बुर्ग हायकोर्टाचे न्यायमूर्ती होते. त्यांना इंग्रजी चांगले येत होते. त्यामुळे चांगला सुखसंवाद झाला. भारतीय व जर्मन न्यायसंस्थेबद्दल तौलनिक चर्चा आम्ही केली. त्यांची चेंबर सुखसोयींनी सज्ज होती. श्री. कोशमनना भारताबद्दल आदर दिसला. ते म्हणाले, सेवानिवृत्तीनंतर जमल्यास भारतास भेट देण्याचा विचार आहे. नंतर शहराचा चारचाकी फेरफटका करून सरळ विमानतळावर जाऊन हॅम्बुर्गचे विमान पकडले.

रात्री ७-५० ला विमान हॅम्बुर्ग शहरावर आले. आतापर्यंतच्या प्रवासात दिवसाच विमान उतार अनुभवला होता. आज मात्र विमान हॅम्बुर्गवर आले तो लाल, हिरव्या, निळ्या रंगांच्या दिव्यांचे अजस्र

अनुक्रमणिका

इंद्रधनुष्य डोळ्यापुढे एकदम चमकले. पुण्यास रात्री जाताना सह्याद्रीच्या दरीत खोपोलीचे दिवे झगमग करतात. तो अनुभव आठवला; पण ही दिव्यांची आरास घनदाट होती. असे वाटले की, हॅम्बुर्ग नगरीच्या नजरेत नवरत्नांची खाणच तरळते आहे. उतरण्यापूर्वी नेहमीप्रमाणे आकाशयानाने उंच झेप घेतली व झूमदिशी खाली सूर मारला. चाके जमिनीला टेकली व फुलसवुटेल विमानतळावर मी उतरलो.

टॅक्सीने अॅटलांटिक हॉटेलवर आलो.एका निळयाशार तलावाच्या काही डौलदार राजहंसाप्रमाणे अॅटलांटिक शोभत होते. दर्शनी तळमजल्यावर पाहुण्यांना रेंगाळण्यासाठी उत्तम कोचे ठेवली आहेत एका प्रचंड दिवाणखान्यात. पश्चिम जर्मनीत हे हॉटेल आदर्श समजले जाते. वेटरचे व चेफचे या हॉटेलात शिक्षण घेण्यासाठी उमेदवार उत्सुक असतात. डिनर हॉल भव्य सुंदर आहे. वेटरचे पोषाख पांढरे-शुभ्र व टीपटॉप. पूर्वी गव्हर्नरांबरोबरच्या शरीररक्षकांप्रमाणे इथले वेटर्स स्मार्ट व तत्पर आहेत. ताठ मानेने नि लष्करी शिस्तीने त्यांची ये-जा चालू असते. पण वागायला विनम्र, हसतमुख (उसने) सेवा नसली तरी मनपसंत सेवा निश्चित आहे. हे सत्य आहे, जाहिरात नव्हे.

डिनर दहाला संपले. मग एकटाच समोरील तळयाकाठी फिरायला बाहेर पडलो... दिव्यांची प्रतिबिंबे पाण्यात जलक्रीडा करीत होती. आजुबाजूला फार मोठी माणसे दिसली. पण तशा रात्रीही एक वयस्कर गोरे जोडपे तलावाच्या चमकदार पाण्यात गळ टाकून संथपणे मासेमारी करीत होते. मुंबईसारखी भेळ वगैरे काही मुखशुद्धी मात्र या पाणवठ्याच्या काठी दिसली नाही.

## गोदीतील चोऱ्यांवर उपाय

परत येताना एक मौज टिपली. रहदारी दिव्यांसमोर लाल दिवा असल्याने मोटारींची झुंड गप्प उभी होती. पण हिरवा दिवा लागताच त्या गाड्या आपल्याकडील विजेच्या लोकलप्रमाणे अतिवेगाने सुसाट निघाल्या. जणु काही एखादी शर्यतच जिंकायची आहे अशा त्वरेने! या वेग-वेडामुळे तिकडे रहदारीचे जीवघेणे अपघात फार होतात. कारण भलत्या वेळी, नको त्या ठिकाणी रस्ता ओलांडावयास लागलात तर या तुफानी माऱ्यापुढे साफ चक्काचूर व्हायचा.

दुसऱ्या दिवशी सकाळी हॅम्बर्गचे आंतरराष्ट्रीय खुले बंदर पाहायला गेलो. एलबे नदीच्या काठी हे अवाढव्य बंदर फोफावले आहे. एका बोटीने बंदराचा फेरफटका मारला. हार्बरमास्टर व पीटर्स माझ्याबरोबर होते. त्यांना सांगितले, पाची खंडांतून लहान-मोठ्या बोटी येथे येतात. रोज सुमारे ४०० जहाजे बंदरात असतात. हे मुक्त बंदर असल्याने लाल चीनच्या प्रचंड तरंगिणीही दृष्टीस पडल्या. त्यांच्या बंबावर लाल रंग होता. व चिनी भाषेत काही मोठमोठी चित्रमय अक्षरे लिहिली होती. भारताच्या बोटीपण दिसल्या. बोटीतून धान्य उतरविण्यासाठी कंटेनर यार्डमध्ये अजस्र बंब आहेत. त्यातून धान्य बोटीवर चढविण्या-उतरविण्याची यांत्रिक क्रिया हस्तक्षेपाशिवाय फार सफाईने व त्वरीत होते. फक्त तासात ३० हजार टन धान्य बोटीवरून धक्क्यावर येते! मी पोर्टसंना विचारले, एवढ्या प्रचंड बंदरात चोऱ्या वगैरेंचा मुळमुळाट असणार नाही. ते म्हणाले मुळीच नाही. येथे १९४० पासून गोदी कामगारांचा संप वगैरे काही नाही. चोरीवर उपाय म्हणजे एखाद्या कामकऱ्याजवळ चोरीचा माल मिळाला की कोर्ट-कचेरी न करता जागच्या जागी हार्बर मास्टर त्याचा डॉकपास काढून घेऊन पाच वर्षे बडतर्फ करतो. या तात्काळ जबर शिक्षेमुळे गोदीत चोऱ्या फार क्वचित्.

एलबे नदीच्या काठी बंदरावर घड्याळाचा उंच मनोरा आहे. हा अनेक मैलांवरून बोटींना दिसतो. मुंबईचा राजाबाई टॉवर अपोलो बंदरावर उचलून ठेवला तर कशी शोभा दिसेल नाही! एलबे नदीतून निघून जहाजे पूर्वेस बाल्टीक समुद्रात किंवा पश्चिमेस उत्तर सागरात संचार करू शकतात. म्हणून जागतिक जल-व्यापारात हॅम्बर्गला आगळे स्थान आहे.

बंदराचा जलसंचार आटोपल्यावर पीटर्ससाहेबांचे आभार मानले व त्यांना म्हटले भारतात तुम्ही कधी आला होता का? ते म्हणाले, अजून नाही. पण यायची फार इच्छा आहे. तेव्हा माझ्या-जवळील गेटवे ऑफ इंडियाचे चित्र-कार्ड मी त्यांना भेट दिले. ते

पाहून भारतभेटीची उत्सुकता आता फारच वाढली आहे असे उत्तम इंग्रजीत म्हणून त्यांनी वाय् वाय् केले !

हॅम्बर्ग हे पूर्वीच्या ग्रीक राज्याप्रमाणे एक नगरराज्य आहे. वस्ती सुमारे १९ लाख. हॅम्बर्ग बंदरावरून निघालो तो थेट हायकोर्टात आलो. न्यायमूर्ती डॉ. व्होलगार यांना भेटलो. ते एका वर्षानी निवृत्त होणार. दुसरे न्यायमूर्ती श्री. उझमान. हे मध्यमवयीन, हसतमुख, उंचेपुरे, लालबुंद आहेत. त्यांचा स्वभाव अत्यंत विनोदी-आनंदी आहे. आनंदी माणसांचा स्वभाव जगाच्या पाठीवर कुठेही व कुणालाही हवासा वाटतो. कारण दुसऱ्याचे दुःख समजून घेता आले नाही तरी आनंद तावडतोब उमजतो. माणसांना आकर्षित करणारा आनंद हा लोहचुंबक आहे.

बॉनच्या कोर्टात पुरेसा वेळ नसल्याने सबंध खटला ऐकता आला नव्हता, पण हॅम्बर्गच्या कोर्टात ती संधी लाभली. जर्मन न्यायसंस्था ही कॉन्टीनेंटल् न्यायशास्त्रावर आधारली आहे. भारताची न्यायसंस्था अँग्लोसॅक्सन पायावर उभी आहे. मी कोर्टात प्रवेश केला व प्रेक्षकात बसलो. रस्त्यावर ठेवलेल्या मोटारीचे दार उघडून चोरी करण्याचा प्रयत्न करण्याचा आरोप दोघांवर होता. त्या भव्य कोर्टात सारं कसं शांत शांत होते. त्यामुळे न्यायदेवतेच्या गाभाऱ्यात गंभीर वातावरण होते. न्यायमूर्तींचे उजव्या बाजूला एका पिंजऱ्यात सरकारी वकील व दुसऱ्या पिंजऱ्यात डावीकडे आरोपीचे वकील बसले होते. न्यायासनासमोर पण जरा अंतरावर आरोपी होते. न्यायमूर्तींच्या समीप उभा राहून साक्षीदार साक्ष देत. आपल्याकडे साक्षीदाराचा पिंजरा डावीकडे असतो. कोर्टात एकदाच पोलिस ऑफीसर दिसला.

आपल्याप्रमाणेच सरकारने पुरावा देऊन गुन्हा शाबीत करीपर्यंत आरोपी हा निरपराध आहे असे गृहीत कृत्य येथेही आहे. पण आपल्याकडे सुमारे शेकडा तीस गुन्हे शाबीत होतात तर येथे सुमारे नव्वद टक्के गुन्हेगारांना शिक्षा होते. तसेच जामीनाच्या बाबतीत. भारतात जामीन देणे हा जवळ जवळ नियम आहे व पोलिस कोठडीत रवानगी फार कमी प्रसंगी. येथे मात्र शेकडा नव्वद आरोपींना जामीन नाकारला जातो. भारताप्रमाणे पकडल्यापासून चोवीस तासात आरोपीस मॅजिस्ट्रेटपुढे उभे करावे लागते; पण आपल्याकडे रिमांड एकावेळी जास्तीत जास्त चौदा दिवसांचा. तर यथे सहा महिन्यांचा एकजिनसी रिमांड देता येतो. त्यामुळे पकडल्यानंतर सहा महिन्यापर्यंत कोर्टापुढे आरोपीस न आणले तरी चालते.

## साक्षीनंतर शपथेची पद्धत

खटला चालू झाला. साक्षीदारास शपथ न देताच काम चालू झाले. न्यायमूर्तींपासून जेमतेम पाच फुटांवर साक्षीदार उभा होता. प्रथम त्याने काय पाहिले ते निवेदन केले. नंतर न्यायमूर्तींनी पोलीस जबानीच्या आधारे त्याला काही प्रश्न केले. मग सरकारी वकीलांचे प्रश्न, बचावाच्या वकीलांचे काही सवाल, आरोपीचे प्रश्न झाले. साक्ष संपली. विशेष म्हणजे आपल्याप्रमाणे तेथे सूक्ष्म तपशीलवार उलटतपासणी दिसली नाही. मोटारीचा रंग कोणता, दिशा कोणती, आरोपीचे तोंड कुठल्या दिशेस होते वगैरे तपशीलात्मक सवाल करून साक्षीत बारीकसारीक विसंगतता दाखवन साक्षीदार खोटा आहे, अशी कुशल क्रॉस एक्झामिनेशन इकडे नसते. तसेच फौजदारी खटल्याला पुराव्याचा कायदा नाही. ऐकीव पुरावा सुद्धा न्यायालयात देता येतो. त्यावर विसंबून राह्यचे की नाही हे न्यायमूर्ती ठरवतात. नंतर वकीलांच्या मुद्देसूद तक्रारी ऐकण्यात आल्या. त्यापूर्वी बचावाच्या वकीलांच्या विनंतीवरून सर्व साक्षीदारांना न्यायालयासमोर रांगेत उभे करण्यात आले. न्यायमूर्तींसकट सर्वजण उभे राहिले. नंतर न्यायमूर्तींनी प्रत्येक साक्षीदाराला तथ्य पश्चात् [Post-facto] शपथ देऊन वदवयास लावले की, मी दिलेला पुरावा सत्य आहे. शेवटी सरकारी वकीलांनी सांगितले, पुरावा सबळ नाही. आणि आरोपी बेगुन्हा आहे. सरकारी वकीलांचा हा प्रांजलपणा न्यायशुद्धतेच्या दृष्टीने परिणामकारक वाटला. नंतर न्यायमूर्ती चेंबरमध्ये गेले व तीन मिनिटांत परत न्यायपीठावर विराजमान झाले. स्टेनोला त्यांनी मुद्देसूद निकालपत्र सांगितले. आरोपींची निर्दोष सुटका झाली. इतकी बंधने असूनही आरोपी बंधमुक्त झाला.

गंभीर गुन्ह्यांची चौकशी तीन विधि तज्ञ न्यायाधीश व दोन व्यवहार तज्ञ (Lay Judges) न्यायाधीशांसमोर होते.

येथे गुन्ह्यांची संख्या कमी, पण न्यायाधीश पुष्कळ आहेत असे कळले. वकीली न करता न्यायाधीश होता येते. आपल्याकडील इंटर आर्टस्‌नंतर चार वर्षे विधी शिक्षण घ्यायचे आणि मग अडीच वर्षे न्यायाधीश म्हणन प्रशिक्षण घेतल्यावर लगेच न्यायाधीश म्हणून नेमणूक होते. डॉक्टरप्रमाणेच न्यायाधीश व्हायचे की नाही याचा निर्णय आधीच घ्यावा लागतो.

न्यायाधीशांना बाराशे डाइश मार्क म्हणजे सुमारे अडीच हजार रुपये प्रतिमास वेतन आहे. दोनतृतियांश निवृत्तिवेतन मिळते आणि पासष्ट वयापर्यंत न्यायदेवतेची सेवा करता येते. संघराज्य कोर्टाच्या न्यायाधीशांना ६८ ही निवृत्ती वयोमर्यादा आहे. एकंदरीत युरोपातील न्यायाधीशांची स्थिती समाधानकारक वाटली.

दोन वाजले. उपाहाराची वेळ झाली. हॅम्बर्गच्या डिस्ट्रीक्ट न्यायालयाचे अध्यक्ष श्री. उझमान व कौंटी कोर्टाचे अध्यक्ष डॉ. व्होगलर यांच्या समवेत लंचसाठी नवीनच बांधलेल्या टेलीव्हीजन टॉवरवरील हॉटेलात गेलो. चारशे फट उंचीचा हा प्रकाशवाणी-मनोरा. आकाशात खुपसलेल्या दांडपट्ट्यासारखा वाटला. वीज-पाळण्याने झरकन् वर गेलो. इतक्या वर बसून लंच घ्यायचे होते ही कल्पनाच अलौकिक होती. आरक्षित टेबलावर जाऊन बसलो. तेथे पश्चिम जर्मनीच्या ध्वजाबरोबर भारतीय राष्ट्रध्वजही टेबला-वर फडकत होता. शहराचा बाहेरील देखावा त्या काचेच्या बुरजा-तून रम्य वाटला. हॅम्बर्ग शहराच्या उंच इमारती समोर दिसत होत्या. गप्पा सुरू झाल्या न्यायसंस्थेबद्दल. इतक्यात समोर सहज लक्ष गेले. तो इमारतीच्या जागी हिरवळ दिसली. हा ट्रान्सफर सीन कसा झाला? कारण कळले की, तो एक सरकता मंच होता. मनोऱ्याच्या भिंती अचल पण हॉटेलच्या सर्व मजला हळुवारपणे गोल गोल सर-कतो. सुमारे एका तासात ही प्रदक्षिणा पुरी होते. म्हणजे लंच संपे-पर्यंत आपल्यास सर्व हॅम्बर्ग नगरीचे चौफेर दर्शन होते. खा, प्या आणि पहा. एकदमच ! आमच्या पलिकडची एक महिला मध्येच किंचाळत उठली की, माझी पर्स गायब झाली. तिने ती भिंती-जवळील लाकडी कठड्यावर ठेवली होती. पर्स-पळवे येथे नाहीत. कठडा स्थिर होता पण हॉटेल मात्र फिरत असल्याने ती पर्स मागे पडली होती. व पर्सवाली पुढे सरकली होती. टॉवरचा फेरा पुरा होताच त्याच जागी अंतस्थ वस्तूंसह पर्स जागच्या जागी मिळाली ! पर्स पुनःप्राप्तीचे सर्वांनी सुहास्य स्वागत केले. टाळ्या पण पडल्या !

माझ्या मनात आले, भर शहरात निर्माण केलेल्या थंड हवेच्या ठिकाणाची ही कल्पना मानवाच्या भौतिक प्रगतीचे प्रतीक होय. मुंबईत महाबळेश्वर ! शहरात हिल स्टेशन ! सूप, उकडलेल्या भाज्या, आइस्क्रीम वगैरेचे लंच चालले होते. श्री. उझमान यांनी आपले बोट उंचावून हॉटेलच्या छतावर रंगवलेले नवे तारे दाखवले व मला म्हणाले या छतावर हे नवे तारे कशाला रेखाटलेत ? मी हसून म्हटले "मानवाने ही एक नवी सृष्टी इतक्या उंचावर उभविली आहे. नव्या सृष्टीला नवे तारे नकोत का ?" त्या दोघां न्यायाधीशांनी ग्लासेस

उंचावले व To your health म्हणून ओठास लावले.

मी त्यांना म्हटले हा मनोरा म्हणजे मानवाच्या आंतरिक अशांततेचे प्रतीक आहे. या धरणीच्या अतिपरिचयामुळे मानवाला तिचा आता कंटाळा आलाय्. म्हणून तो धरणीपासून दूरवर चंद्राकडे झेपावतो आहे. सर्वांना चंद्रयानात बसणे शक्य नाही पण त्या टेलेव्हीजन टॉवरमध्ये बसल्यावर चंद्रयानाच्या रॉकेटमध्ये वसल्याचा धोकाशून्य अनुभव सामान्यालाही घेता येतो. मुंबईमध्ये असे उच्च-स्तर फिरते हॉटेल निघण्याचे ऐकीवात आहे!

टेलीव्हीजन टॉवरवरून लिफ्टने खाली आलो व अटलांटिक हॉटेलवर परतलो.

सायंकाळी हॅम्बर्गच्या ऑपेरा हाऊसमध्ये गीसेल हे नृत्यनाट्य पाहिले. त्यात गाणी, भाषणे काही नव्हते. फक्त पार्श्वसंगीताच्या तालासुरावर हे लोभस नृत्यनाट्य सादर केले होते. केवळ हाव-भावांच्या द्वारेसुद्धा नाट्याचा आविष्कार किती परिणामकारक होऊ शकतो ते पहाण्यास मिळाले. प्रयोग चालू असता कोणी टाळी वाजविली नाही की हूं का चूं केले नाही. खटला ऐकणाऱ्या ज्युरीच्या गंभीर चेहऱ्याने प्रेक्षक ऑपेरा पाहात होते. अंक संपल्यावर मात्र टाळ्यांचा जल्लोष प्रदीर्घ काळ झाला व नटनटचांना पुन्हा पुन्हा बाहेर येऊन रसिकांची अंतिम दाद स्वीकारावी लागली.

दुसऱ्या दिवशी पाऊस पडत होता. 'मेघालोके भवति सुखिनं' अशी हुरहुरती वृत्ती पावसाच्या सौम्य सरींनी चेतवली होती. हॅम्बर्गला दरवर्षी पाच लाखांहून अधिक परदेशी पाहुणे भेट देतात. रस्त्यात निरनिराळ्या देशाचे लोक दिसतात. एकंदर कॉस्मॉपॉलीटन वातावरण आहे. मुंबईकरांना अपरिचित नाही ते!

## लोकशाहीवरच श्रद्धा

दुपारी एका जर्मन मित्रावरोवर विजेच्या लोकलने त्याच्या उपनगरातील सुंदर टुमदार घरी गेलो. यांत्रिक सुखसोयी घरात होत्याच. शिवाय पुस्तकेही खूप होती. ती पाहूनच मला खूप बरे वाटले. त्या मित्राचे आईवाप दुसऱ्या महायुद्धात वॉम्बहल्ल्यातच मारले गेले होते. त्याला दुसरे कोणीही नव्हते. अमेरिकेत जाऊन त्याने उच्च शिक्षण घेतले होते. आत्यंतिक दुःखामुळे तो शब्दात गोड परंतु भावनेने कटु वाटला मला! हॅटस्ची खूप आवड दिसली. म्हणून काऊवॉय हॅट, मेक्सीकन मोठी शिमटी सोंब्रेरो हॅट् वगैरे अनेक हॅटस् घरात दिसल्या. नाझींबद्दल त्याला तिरस्कार होता फारच! अमेरिकनांसंबंधी तो चांगले बोलला व म्हणाला कोणच्याही देशाची प्रगती शांततेच्या - लोकशाहीच्या मार्गानेच झाली पाहिजे तरच जगात शांतता नांदेल.

हॅम्बर्गचा हेजेनबेक झू फार विविध सुंदर आहे. त्याला धावती भेट दिली. सुमारे तीस वर्षापूर्वी मुंबईत हेजेनबेक ही जगप्रसिद्ध जर्मन सर्कस पाहिली होती. त्यातील खेळाडूंचा सरसपणा अजूनही आठवतो. त्यातले कोणी प्राणी अजून तेथे आहेत का ते पाहिले पण ओळख पटली नाही. या प्राणीगृहातील लांब पिसाऱ्याचे डौलदार मोर फार प्रेक्षणीय आहेत.

नंतर अटलांटिक हॉटेलवर परत जाऊन विमान पकडले.

पॅन अमेरिकनच्या प्रचंड भव्य विमानाने रात्री ८ वाजता फ्रँक-फर्ट ऑनमेनच्या विमानतळावर उतरलो. सामान दालनातून सामान घेऊन सर्व प्रवासी घरी, हॉटेलवर गेले, मी एकटाच उरलो. मला घ्यायला एक जर्मन गृहस्थ येणार होता. दालनावाहेरच्या हॉल-मध्ये एकच तरुण रेंगाळताना दिसला. मला वाटले तोच तो असावा म्हणून मी त्याला विचारले की, तुम्ही कुणाची वाट पाहाता? त्यांनी मला हातातला कागद दाखवला. त्यावर मिसेस. उर्सेकर असे लिहिले होते. काय चूक आहे ती माझ्या लक्षात आली. मी माझे नांव सांगितले.

श्री. मिलर म्हणाले, 'मी साडी नेसलेल्या भारतीय महिलेची अपेक्षा करीत होतो.' मी त्यांना सांगितले. मीच तो–ती नव्हे–भारतीय प्रवासी. एका एस्.मुळे हा संशयकल्लोळ झाला. पुण्यात व चा मा केल्यामुळे शोककथा निर्माण झाली, तर आज फ्रँकफर्टला Mr. बद्दल Mrs. टाइप केल्याने चूक लक्षात आल्यावर श्री. मिलर मनसोक्त हसले! मी म्हटले मला पाहून अपेक्षाभंगाने तुमची निराशा झाली असेल नाही या उद्‌गारांनी तर त्यांना हसू आवरेना!

इकडे दक्षिण व सिंध अशी दोन हैदराबाद शहरे आहेत तशीच फ्रँकफर्ट (मेन नदीवरील) व फ्रँकफर्ट-ओडेन नदीवरील अशी एका नावाची दोन शहरे असल्याने मेनवरील असे लिहावे लागते.

## बाथ टबमधून टेलीफोन

फ्रँकफर्टर हॉफ हॉटेलात मुक्काम होता. हे बादशाही आली-शान हॉटेल आहे. माझी खोली म्हणजे राजदालनच होते. त्यात कमीत कमी वीस दिवे होते. मंचकाच्या बाजूला टेलिफोन व रेडिओ होता. त्यावर दोन चॉकेलेट ठेवले होते. खोलीच्या मधल्या टेबलावर एक फळांची वशी–खऱ्या–रंगीत लाकडी नव्हे. त्यावर हॉटेल मॅनेजर मि. पेयर यांच्या हिरव्या सहीचे छोटे कार्ड त्यावर with best Compliments छापलेले. वाथरूम पण दिव्यांनी व काचसामानाने झगमगलेली. टववाथ घेतला तर हातासरशी टेलिफोन. स्नान करता करता या परदेशात बोलण्यासारखी ओळख नाही, पण वाटले टववाथ्चा फोन नाहीतर केव्हा वापरता येणार? म्हणून खाली हॉटेल काउंटरलाच फोन करून विचारले. 'बरोबर किती वाजले हो'. नम्र आवाजात उत्तर मिळाले. मला त्यात रस नव्हता. टववाथ्मधून फोन केला या आनंदरसातच मी बुडालो होतो.

हॅम्बर्ग हे प्रवाशांचे शहर आहे; तर फ्रँकफर्ट हे व्यापारी शहर युरोपचा मध्यबिंदु समजला जातो. मेन नदीच्या काठी ही रेखीव नगरी वसली आहे. अत्यंत अमेरिकनाळलेले शहर असे यांचे वर्णन

(पान ५८ वर)



# प हि ली रा त्र

—पंडित क्षीरसागर



विकास बिछान्यावर स्वस्थ पडला होता. परंतु आजच्या मधुर कल्पनेनं तो फार आनंदात होता. आजची रात्र पहिली रात्र होती. ज्या रात्रीची तो अत्यंत उत्सुकतेनं वाट पहात होता व जी कधी येईल असं त्याला होऊन गेलं होतं, ती पहिली रात्र शेवटी एकदाची आली होती. तो आजच्या रात्रीची सुखस्वप्नं पहाण्यात गुंगून गेला होता. पहिल्या रात्रीविषयी त्यानं खूप वाचलं होतं. त्याच्या विवाहित मित्रांनी त्यानं न विचारताही पहिल्या रात्रीचे किस्से रसाळपणे त्याला सुनावले होते. एवढंच काय पण तो कथालेखक असल्याने पहिल्या रात्रीचा यत्किंचितही अनुभव नसता त्यानं त्या प्रकारच्या काही गोष्टीही लिहिल्या होत्या. गोष्टी लिहिताना व मित्रांचे किस्से ऐकताना त्याला खूप सुख झालं होतं. मग प्रत्यक्ष पहिल्या रात्रीचे सुख किती अवर्णनीय असेल !

रात्र चांदणी होती. चंद्राचं पिठूर चांदणं सर्व आसमंतात पडलं होतं. खोलीच्या खिडकीतून बाहेरचा देखावा मोठा मस्त दिसत होता. कुठून तरी रातराणीचा वास येऊन त्याला धुंद करीत होता. पहिली रात्र म्हणून त्यानं मुद्दाम एक मोठा मोग-ऱ्याचा गजरा आणून बिछान्यावर ठेवला होता. तो रातराणीच्या सुवासाच्या धुंदीत भर घालीत होता.

त्या सकाळी त्याचे मित्र त्याच्याशी बोलत असता त्याची गोड थट्टा करीत होते. ती थट्टा अगदी ठराविक प्रकारची होती. व ज्यांचं लग्न होतं त्यांची याच प्रकारे थट्टा होत असते. जरी ती थट्टा ठराविक चाकोरीची होती तरी ती त्या थट्टेनं तो सुखावला होता.

"अरे, हा विकास आता आपल्याला ओळखही दाखवणार नाही."

"हो ना. वैनी बरोबर असल्या की आपल्याला न पहाताच पुढं जाईल."

"बरोबर आहे. आता तो एका देखण्या माणसाच्या सहवासात गुंग होणार आहे."

विकासच्या नजरेपुढं एक दृश्य आलं. आपण पहिल्या रात्रीचे अनुभव सांगतो

आहो आणि बाकीचे सर्व मित्र उत्सुक चेहरे करून ऐकत आहेत. मधून मधून ते मित्र आपल्याला नाजुक प्रश्न विचारीत आहेत.

खरोखर असे प्रसंग खुलवून सांगावेत अशीच देखणी पत्नी त्याला लाभली होती. विशेष म्हणजे हा त्याचा प्रेमविवाह होता. त्यामुळे पहिल्या रात्रीची गोडी काही न्यारीच असणार होती.

त्याला तिच्याशी ओळख झाल्याचा प्रसंग आठवला. तो महानगरपालिकेत ओव्हर-सिअर म्हणून नुकताच नोकरीला लागला होता. कॉन्ट्रॅक्टरच्या कामाची बिलं ऑडीट खात्यात तपासली जात. वंदना ऑडिट खात्यात काम करीत असे. ती क्लार्क होती. कॉन्ट्रॅक्टरच्या कामाची बिलं तपास-णारे चार पाच क्लार्क होते. त्यात ती एक होती. ते बिलं तपाशीत म्हणजे नुसती आकडेमोड तपाशीत. कारण त्यांना तांत्रिक ज्ञान मुळीच नव्हतं. त्यामुळं आकडेमोड तपासताना त्यांना बऱ्याच अडचणी व शंका येत. त्या शंकांचं निरसन करण्यासाठी ओव्हरसिअर्सना ऑडिट खात्यात जावं लागे.

विकासनं मांडलेलं बिल तपासण्यासाठी वंदनाकडं गेलं होतं. त्या बिलात तिला बऱ्याच अडचणी आल्या. त्यासाठी विका-सला तिच्याकडे जावं लागलं. तो गेला तेव्हा तिनं त्याला समोरच्या खुर्चीत बस-ण्यास सांगितलं. तिला पाहून तो बराच चकित झाला. कारण महानगरपालिकेत इतकं देखणं सौंदर्य पहायला मिळेल अशी त्याची कल्पना नव्हती. तिचे डोळ टपोरे व भावपूर्ण होते. त्या डोळयांच्या पहिल्या नजरेतच तो गुंतला गेला. तो जसा चकित झाला तशी तीही चकित झाली होती. कारण विकासही दिसायला चांगला होता. सुदृढ आणि उंच होता... त्यामुळं प्रथम-दर्शनी दोघांचीही एकमेकांवर छाप पडली.

त्यानं बिलातल्या शंका तिला समजावून सांगितल्या. मग वारंवार या कारणासाठी त्याला तिच्याकडे जावं लागू लागलं. त्यांची ओळख झाली. विकास हा छुपा साहित्यिक होता. तो मासिकातून गोष्टी

**...अरे, त्याचे डोळे बघ कसे तांवारले आहेत ते. मी म्हटलं नव्हते हा पहिली रात्र गाजवणार म्हणून?....कायरे, बाऊंड्री की सिक्सर? का डिक्लेअर?... विकास फक्त हसला ...**

लिहीत असे. विकास याच नावानं. हे वंदनाला कुणीतरी सांगितलं. त्यांची नंतर भेट झाली तेव्हा ऑफिसचं काम संपल्यावर ती त्याला म्हणाली, "तुम्ही म्हणे लेखक आहात?"

तो चमकला व म्हणाला, "कोण म्हणालं? कुणी सांगितलं?"

"कळलं आम्हाला, आता एवढंच सांगा की हे खरं आहे का?"

"खरं आहे. लिहितो मधून मधून."

"मला तुमचं आश्चर्य वाटतं, तुम्ही इंजिनिअरींगचे पदवीधर असून या वाटेला कसे वळलात?"

"वळलो असाच. काही काही वेळा कल्पना सुचतात. राहवत नाही. मग लिहितो."

"कोणकोणत्या मासिकात गोष्टी आल्या त्या सांगा तरी. आम्ही वाचू आणि वेडा-वाकडा अभिप्राय देऊ."

"ते का? तुमचा अभिप्राय वेडावाकडा का म्हणून? तो चांगलाच असणार. मला तो बहुमोलाचा वाटेल. मी 'विकास' या नावानं लिहीतो."

"अय्या!" ती गोड चित्कारली.

"काय झालं हो?"

"अहो मी 'विकास'च्या गोष्टी वाचल्या आहेत. मला आवडल्या. पण ते विकास म्हणजे तुम्ही असं मला वाटलं नव्हतं."

"माझं नावच विकास आहे. पूर्ण नाव विकास काशीनाथ सदावर्ते असं आहे. माझ्या नावाची आद्याक्षरे घेतली तरी विकास हेच नाव तयार होतं. म्हणून मी विकास नावानं लिहितो."

"अय्या, कित्ती गंमत", तिनं डोळयांची मजेशीर हालचाल केली. ती पाहून तो उल्हसित झाला. आपल्या कथा तिला आवडतात या कल्पनेनं त्याच्या अंगावर मूठभर मांस चढलं.

त्यांची चांगलीच ओळख झाली. तेव्हा एके दिवशी ती बिलं तपासीत असता तो हळूच तिला म्हणाला, "एक गोष्ट विचारली तर राग नाही ना येणार?"

"राग काय म्हणून? विचारा."

"आपण आज फिरायला जाऊ या काय?"

"अगबाई, फिरायला? नको नको."

"नको काय? चला. माझ्याबरोबर फिरायला येणे तुम्हारा आवडणार नाही काय?"

तिनं झटकन् आजुबाजूला पाहिलं. समा-धानाची गोष्ट की कोणाचं लक्ष नव्हतं. ती म्हणाली, "आवडणार नाही असं नाही; पण कसं जमणार?"

"कां नाही जमणार? इच्छा असली की जमेल. आज येता?"

"पण मी मैत्रिणींबरोबर घरी जाते. आज त्यांच्याबरोबर गेलं नाही तर प्रश्न विचारून मला मंडावून सोडतील."

"सांगा काही तरी, मला मावशीकडे जायचं म्हणून."

"पण मला मावशी नाही."

"मग काका, मामा. जे तोंडात येईल ते सांगा. मी जंगली महाराज देवळाजवळ पाताळेश्वर लेणी आहेत ना तिथं थांबतो. तिथं या."

"बघेन. नक्की नाही सांगत. जमलं तर येईन."

"जमवाच. मी वाट पहातो. सहा वाजता या. ऑफिस साडेपाचला सुटतं."

"पहाते."

ऑफिस सुटल्यावर विकास सरळ पाताळेश्वरला गेला. पण सहा वाजले तरी वंदनाचा पत्ता नव्हता. साडेसहा झाले. तेव्हा आता ती येते की नाही अशी शंका त्याच्या मनात निर्माण झाली. आपण फिरायला बोलावलं हे तर तिला आवडलं



अनुक्रमणिका

नसेल ? आपण विचारण्याचं धाडस उगीच केलं. पण कधीतरी धाडस करायला पाहिजेच होतं. नाहीतर कित्येक वेळा जमत असलेल्या गोष्टी केवळ थोड्याशा धाडसाअभावी फिसकटतात. पण ती येते म्हणाली होती. कदाचित मैत्रिणींना गुंगारा देणं तिला शक्य झालं नसेल.

पावणेसात झाले तसा तो उठला व जावयास निघाला. परंतु एवढ्यात समोरून लगबगीनं जरा धावतच वंदना येताना दिसली. जोरात चालण्यामुळं तिचा पदर मागं निशाणासारखा फडफडत होता. केस भुरभुरत होते. ती जवळ आली तेव्हा तिला चांगली धाप लागली होती. कपाळावर घर्मबिंदू उभे राहिले होते. शिवाय असं चोरून एखाद्याला भेटायला जायचं या कल्पनेनं तिचं हृदय धडधडत होतं. तिला पहाताच विकासच्याही छातीचे ठोके वाढले. तो आवंढा गिळीतच म्हणाला, "मला वाटलं आता तुम्ही येत नाही. मी परत जायला निघालोच होतो."

ती म्हणाली, "पण तुम्ही वाट पहाल म्हणून आले. मैत्रिणींना चुकवताना फार प्रयास पडले. काय काय थापा माराव्या लागल्या त्या माझ्या मलाच माहीत!"

आणि त्या दिवसानंतर ते रोज कुठंतरी फिरायला जाऊ लागले. आपण एकमेकांच्या प्रेमात पडलो आहोत हे दोघांनीही ओळखलं होतं व त्यापासून त्यांना फार सुखही होत होतं. त्यांनी विवाहाच्या आणाभाकाही घेतल्या होत्या.



विकासला वडील नव्हते. घरी फक्त आई होती. त्याची एक विधवा मावशी त्याच्या घरापासून एकदोन घरं टाकून पलीकडे रहात होती. ती बरीच श्रीमंत होती. विकासचं सर्व शिक्षण तिनंच केलं होतं. पण तिचा स्वभाव जरा तऱ्हेवाईक होता. म्हणून ती वहिणीच्या घरी न रहाता स्वतंत्र रहात होती. कितीदा तरी विकासनं तिला आपल्या घरी रहायला बोलावलं होतं. पण ती आली नाही.

वंदनाशी प्रेम जमल्यावर विकासनं आपल्या आईला तिच्याविषयी सर्व हकीकत सांगितली. तिला घेऊन तो घरीही आला. आईला व मावशीला वंदना पसंत पडली. वंदनाच्या वडिलांना कळविण्याचे काम विकासच्या हेडक्लार्कनं अंगावर घेतलं. ह्या हेडक्लार्कला एकच वेड होतं. ते म्हणजे लग्न जमविण्याचं! त्याच्या डायरीत इच्छुक वधूवरांचे हजारो पत्ते होते. त्यानं आजपर्यंत कितीतरी लग्नं जमवली होती. विकासची हकीकत त्यानं वंदनाच्या वडिलांना सांगितली व लग्न जमवूनही आणलं. विकास-वंदनाचं लग्न झालं आणि आता विकास वंदना कधी खोलीत येते याची वाट पहात बसला होता.

रात्रीचे नऊ वाजून गेले होते. जरा वेळानं वंदना तांब्याभांडं घेऊन येणार होती. मग तो कडी लावणार होता. तिचा हात धरून तिला हळूच जवळ ओढणार होता. आता तर ती नाही म्हणू शकत नव्हती. त्याला एकदम आठवलं... तो ज्या ज्या वेळी तिला जवळ ओढण्याचा प्रयत्न करी त्या त्या वेळी ती दूर सरत असे. तो तिचा हात नेहमी हातात घेई. तिच्या अंगाभोवती हात घालून त्यानं कित्येक सिनेमाही पाहिले होते. मोठ्या मुष्कलीनं त्याला एक चुंबन मिळालं होतं. ती त्याला जास्त पुढे येऊ देत नव्हती. तो तिला नेहमी म्हणे,

"का अशी दूर सरतेस ?"

"अंऽहं. आता एवढंच बास्."

"मग कधी."

"लग्नं झाल्यानंतर."

"आता तू माझी अन् मी तुझा नाही काय ?"

"आहे. पण लग्न झाल्यावर सगळी तुझी होईन. तोपर्यंत तू धीर धरला पाहिजेस व मलाही मोहात पाडू नकोस."

त्यानं तिचं म्हणणं मानलं होतं. पण अशा अर्धवट जवळ येण्यामुळं प्रणयाग्नी अधिकच भडकत होता; पण त्याला इलाज नव्हता. तिचं म्हणणं खरं होतं.

जिची चातकासारखी विकास प्रतिक्षा करीत होता ती पहिली रात्र आज आली होती. आता रात्रीचे दहा वाजायला आले होते. कोणत्याही क्षणी वंदना त्याच्या खोलीत येण्याची शक्यता होती. तो तिची वाट पहात होता.

दाराबाहेर कांकणांचा आवाज आला आणि वंदना खोलीत आली आणि तांब्या-भांडं तिनं स्टुलावर ठेवलं. किल्ली दिल्या-प्रमाणे विकास ताडकन् उठला व आधी त्यानं दाराला कडी लावली. त्याची ती अधीरता पाहून तिच्या चेहऱ्यावर स्मित झळकलं. त्यानं तिच्याकडे सहेतुक पाहिलं. तिनं लाजून मोठा झक्क मुरका मारला. त्याबरोबर त्याची कानशीलं तप्त झाली. तो झपाट्यानं पुढं झाला व त्यानं तिला जवळ ओढून हृदयाशी घट्ट धरलं.

तिच्या अंगाला मंद सुगंध येत होता. तिनं त्याला इतकं जवळ कधी येऊ दिलं नव्हतं. पहिल्याप्रथम तो हा सुगंध अनुभवीत होता. तीही त्याला घट्ट बिलगली होती. आता त्याला दूर ठेवण्याचं कारण संपलं होतं. जरा वेळ दोघेही एकमेकांच्या मिठीत बद्ध होऊन राहिले. त्यानं तिची हनुवटी धरून तिचं मुख वर उचललं. त्यानं पाहिलं तिचे लालबुंद ओठ थरथरत होते. त्यानं आपला चेहरा खाली झुकवला. आणि तो तिच्या ओठावर ओठ ठेवणार इतक्यात एकच आरडाओरडा झाला. "आग! आग!!"

दोघेही एकदम दचकले. ओरडा चालूच होता. ती म्हणाली, "कुठंतरी आग लागलेली दिसते."

अनुक्रमणिका








"लागू दे. त्यापेक्षा मोठी आग माझ्या हृदयात भडकली आहे. ती आधी शांत करू दे."

"इश्श्" ती त्याला पुन्हा बिलगली. त्यानं पुन्हा आपला चेहरा खाली झुकवला; पण आता मघापेक्षाही मोठा आरडाओरडा झाला. आग ! आग !! लोक धावल्याचे आवाज आले. त्याची मावशी बाहेरून ओरडली. "अरे विकास, मी रहाते त्या वाड्याला आग लागली आहे. बाहेर ये लवकर."

मग मात्र तो चमकला. मोठ्या कष्टानं तिला दूर करून तो बाहेर आला.

आग भयंकर लागली होती. सगळा वाडा बाहेर पडला होता. काहीजण आपापल्या चीजवस्तू वाचविण्याचा प्रयत्न करीत होते. मावशी म्हणाली, "विकास, पलंगाखालची माझी पेटी घेऊन ये आधी. तिच्यात दागिने आणि पैसे आहेत."

त्यानं धावत जाऊन पेटी आणली. मावशीच्या खोलीपर्यंत आग लागली होती. थोडक्यात चुकलं. नाहीतर एक जळतं खांड त्याच्या डोक्यातच पडलं असतं.

कुणीतरी फायर ब्रिगेडला फोन केला होता. फायर ब्रिगेडचे लोक आले, तेव्हा आग चांगलीच भडकली होती. सगळा वाडा पेटला होता व शेजारच्या वाड्याला आग लागू पहात होती. त्या वाड्यापलीकडेच विकास रहात होता तो वाडा होता. फायर ब्रिगेडच्या लोकांनी भराभर काम सुरू केलं. पण नेहमीच्या पद्धतीप्रमाणे पाण्याला प्रेशर नव्हतं. वॉटर वर्क्सला फोन करण्यात आला. आजुबाजूचं पाणी बंद करून इकडे पाणी वळविण्यात आलं. पोलिसांनी येऊन आगीभोवती कडं केलं. आग विझवण्याचे काम सुरू झालं.

वाडे जुने होते. त्यात लाकडांचा वराच वापर करण्यात आला होता. त्यामुळे शेजारचा दुसरा वाडा पेटला. आगीच्या प्रमाणात–विझविण्याचे प्रमाण कमी पडत होतं. तेव्हा आणखी बंब बोलावण्यात आले व आग विझविण्याचं काम जोरानं सुरू झालं.

बघ्यांची गर्दी वाढतच होती व गर्दीत निरनिराळ्या प्रकारचं बोलणं चालू होतं.

"कशी लागली आग ?"

"शॉर्टसर्किट झालं असेल !"

"नाही. याला कारण सिगारेट. सिगरेटी प्यायच्या पण न विझवता फेकून द्यायच्या. तरुण पिढी बेजबाबदार झाली आहे."

"काहो, जुनी पिढी विड्या सिगरेटी ओढीत नाही का ?"

"ओढते. पण विझवून टाकते."

"आगीचा विमा उतरलेला असला तर बरं. नाहीतर मालक अगदी साफ."

"छे. उलट मालकाला फार बरं झालं. कमी भाड्याची जागा होती. आता नवीन बिल्डिंग बांधली की भाडं भरपूर मिळेल."

तेवढ्यात फिल्म इन्स्टिट्यूटमधील विद्यार्थी तिथं मोटारीनं आले. त्यातील एकजण म्हणाला, "काय सुंदर आग लागली आहे ! अशी आग पाहिजे ! परवा आपण स्टुडिओत आग लावून चित्रण केलं ती आग रद्दी होती. काढा, काढा कॅमेरे लवकर, चित्रण करा. परवाच्या आगीचा तुकडा कापून टाकून तिथं या आगीचा तुकडा टाकू."

त्यांनी भराभर कॅमेरे सरसावले व चित्रण सुरू केले. "जितक्या अँगल्सनी चित्रण करता येईल तितक्या करा."

विकासनं मावशीला आपल्या घरी नेऊन ठेवलं होतं. आपली जागा भस्मसात झाल्याचं पाहून तिची स्थिती वेड्यासारखी झाली होती. ती सारखी रडत होती. विकासची आई व वंदना तिची समजूत घालीत होत्या. आग फार मोठी होती. तीन बंबांना आग विझविण्यास पहाटेचे पाच वाजले. पाच वाजता आग पूर्ण विझली, तरी कुठं कुठं थोडी धुमसत होती. पण आता धोका टळला होता. दोन वाडे संपूर्ण जळाले होते. जर आणखी आग टिकली असती तर विकास रहातो त्या वाड्याला आग लागली असती.

विकास आग पूर्ण विझल्यावर घरी आला. त्यानं पाहिलं. बाहेरच्या खोलीत आई, मावशी व वंदना खाली फरशीवरच झोपल्या होत्या. रात्रभर जागरण झालं होतं. त्यामुळे सतरंजी टाकण्याचीही तसदी न घेता तिघी जमिनीवरच पसरल्या होत्या.

विकासनं मुस्कारा टाकला. साडेपाच वाजले होते. कोपऱ्यावरचं इराण्याचं हॉटेल उघडलं असेल. जाऊन एक कडक चहा प्यावा. तो हॉटेलात आला व आपल्या नेहमीच्या टेबलाकडे वळला. त्यानं पाहिलं तो त्याचे मित्र आधीच तेथे येऊन वर्तमानपत्र वाचत चहा पीत बसले होते. एवढी मोठी आग लागल्याचं त्यांच्या गावीही नव्हतं. ते आरामात वाचत बसले होते. आग रात्री उशीरा लागल्यानं तिची बातमीही वर्तमानपत्रात आली नव्हती. त्यामुळे त्या दोस्ताना काहीच कल्पना नव्हती.

तो त्यांच्याजवळ गेला व एका खुर्चीवर बसला. त्याला पहाताच एखादं भूत पहावं अशा आश्चर्यानं त्याचे मित्र त्याच्याकडे पहात राहिले.

"तू आणि इथं ? यावेळी ?"

"अरे चांगल्या गुलाबी साखरझोपेत रहायचं सोडून इथं कशाला आलास ?"

"अरे त्याचे डोळे बघ. कसे तांबारले आहेत ! रात्रभर जागरण केलं आहे बेट्यानं! मी नाही म्हटलं तुम्हाला हा पहिली रात्र गाजवणार म्हणून ! विकास, आपण मानतो बुवा तुला !"

"बाऊंड्री का ?"

"का सिक्सर ?"

"का डिक्लेअर ?"

विकास फक्त हसला. विषादानं.

● ● ●

# भारतीय क्रिकेटचा महान् सम्राट



— दिवाकर बापट

**....सात षटकारांनी आपल्या भोवती अद्‌भूत पराक्रमाचे वलय निर्माण करणाऱ्या परदेशीय खेळाडूला त्याच सामन्यात अकरा षटकार ठोकून सणसणीत उत्तर देणारा हा सम्राट भारतीयांच्या ह्रदयात कायमचे स्थान पटकावून बसला आहे....**

सन १९२५-२६ मधली गोष्ट. एम. सी. सी. चा संघ भारताच्या दौऱ्यावर आलेला होता. ह्या दौऱ्यात हिंदूंच्या संघाविरुद्ध ह्या संघाचा झालेला सामना चांगलाच रंगला. ह्या सामन्याने क्रिकेट-शौकिनांची मने चांगलीच सुखावली. एम. सी. सी. चा एक फलंदाज सी. जी. अर्ल हा त्यावेळी ऐन वहरात होता. ह्या सामन्यात त्याने बघता बघता सात षट-कारांच्या साहाय्याने आपले शतक झळ-कविले. वीज जशी लख्खकन् चमकावी, तसे चहूकडे त्या फलंदाजाचे नाव झळकले. स्टेडियम् नि शहर दोन्हीही ठिकाणी त्या सात षटकारांचीच सर्वत्र चर्चा चालू होती. इतकी अनुपम अन् अभूतपूर्व फलंदाजी कुणाच्याही स्वाधीनची चीज खासच नव्हती! पण कुणाच्या ध्यानीमनीदेखील नव्हते की, हिंदूंच्या संघातील एक तरुण अगदी आश्चर्यकारक रीतीने त्या इंग्रज फलंदाजाच्या त्या दैदिप्यमान् पराक्रमावर कडी करील!! इकडे हा इंग्रज फलंदाज षटकारामागून षटकार ठोकीत असताना हिंदूंच्या बाजूने क्षेत्ररक्षण करीत असलेल्या त्या तरुणाने मनाशी असेच काही भव्य-दिव्य करून दाखवावयाचा संकल्प सोडला होता.

एम्. सी. सी. चा डाव संपला. आता हिंदू संघाची खेळावयाची पाळी आली. त्या संघातील खेळाडूंच्या क्रमानुसार ह्या तरु-णाचा क्रम आला. आंतर्राष्ट्रीय पातळी-वरचा सामना खेळण्याची त्याची ही पहि-लीच वेळ होती. अदम्य उत्कंठेने नि असीम विश्वासाने त्याने पॅव्हिलियनमधून निघून मैदानावर पाऊल टाकिले. त्याच्या चेहऱ्या-वर भरून पसरून राहिलेला उत्साह नि विश्वास अनाठायी नव्हता हे त्याने अगदी थोडयाच वेळात आपल्या खेळाने सिद्ध करून दाखविले. त्या दिवशी त्याने करून दाखविलेल्या पराक्रमाचे वर्णन केवळ 'फॅटम्' ह्या एकाच शब्दाने करता येईल. केवळ एकशे पंधरा मिनिटात अकरा षट-कार नि तेरा चौकार ठोकून त्याने दणदणीत एकशेत्रेपन्न धावा जमविल्या. तर्क नि शक्ती ह्यांची सारी रेकॉर्डस् तोड-ताना त्याने केलेला हा भीमपराक्रम पाह-ताना शौकिन विलक्षण खूष झाले होते. त्याच्या प्रत्येक षटकाराचे त्यांनी फटाके वाजवूनच स्वागत केले.

गोलंदाज शीघ्रगती असो की मंदगती असो; त्याची बिलकुल क्षिती न बाळगता आक्रमक अन् चढाईचा खेळ करणाऱ्या हिंदूंच्या संघातील त्या तरुण खेळाडूचे नाव होते **श्री. कोट्टारी कंकय्या नायडू**. कर्नल सी. के. नायडू ह्या नावानेच ते ह्यावेळपर्यंत









अनुक्रमणिका

क्रिकेटविश्वाला परिचित होते.

दुसऱ्या दिवशीच्या वृत्तपत्रातून सी. कें.-च्या ह्या पराक्रमाची रसभरीत वर्णने छापून आली अन् क्रिकेटप्रेमी जनता सात षटकार ठोकणाऱ्या त्या इंग्रज फलंदाजाचा मोठेपणा साफ विसरून गेली.

जे दुसऱ्या कुणालाही जमण्यासारखे नसे, ते करून दाखविण्याची हातोटी किंवा जिद्द सी. कें.जवळ भरपूर होती नि म्हणूनच सी. के. अमर आहेत. इंग्लंडकडील मॉरीस टेट, जॉर्ज गियरी, मर्सर, वायस् अन् एस्टील अशा एकापेक्षा एक वरचढ नि श्रेष्ठ गोलंदाजांविरुद्ध आक्रमक खेळ करून दाखविणे ही काही साधी गोष्ट नव्हती. एकटे सी. के.च ती करू शकले होते.

सन १९३२ मध्ये इंग्लंडच्या दौऱ्यावर गेलेल्या भारतीय संघातील सी. के.चे स्थान अनन्यसाधारण महत्त्वाचे होते. त्या संघाचे ते प्रमुख सदस्य होते. लॉर्डस्च्या मैदानावर खेळल्या गेलेल्या एम. सी. सी. विरुद्धच्या सामन्यात भारतीय संघाने नोंदविलेल्या एकूण २२८ धावांपैकी ११८ धावा (अन् पुन्हा त्याही नाबाद) एकट्या सी. कें.च्या होत्या. ह्यावेळी एम. सी. सी. च्या संघात जे. सी. व्हाईट नावाचा फिरकी गोलंदाज होता. अचूकपणाबद्दल व्हाईटचा मोठा दबदबा ! पण नायडूंनी त्यालाही भीक घातली नाही. त्याच्या अचूक गोलंदाजीवर त्यांनी खणखणीत दोन षटकार ठोकलेच. एम्. सी. सी. संघातील एका क्षेत्ररक्षकाच्या लक्षात आले की, नायडूंच्या चेंडू उचलून मारण्याच्या पद्धतीत काही कमजोरी आहे. तो चटकन व्हाईटजवळ आला अन् त्याच्या कानाशी लागला. "असाच आणखी एक चेंडू टाक की, तो तंबूत परतलाच म्हणून समज. सी. के.नी त्याचे बोल ऐकले होते. अन् म्हणूनच की, तशाच प्रकारचे दोन चेंडू व्हाईटकडून येताच त्यांनी दोन सुरेख षटकार ठोकले. भारताचा डाव संपेपर्यंत नायडूंची त्या दिवशी चौफेर आतषबाजी चालू होती अन् ते तंबूकडे परत फिरले ते दणदणीत नाबाद शतक झळकवूनच !

एम. सी. सी. संघाच्या त्या क्षेत्ररक्षकाचा चेहरा मात्र त्या दिवशी फोटो काढण्याच्या लायकीचा झाला होता !

ह्या घटनेनंतर काही दिवसांची गोष्ट. एके दिवशी रात्री भोजनाच्या वेळी सी. कें.नी हा किस्सा साऱ्यांना सुनविला. अन् हसत हसत म्हटले, "ह्या इंग्रज खेळाडूंकडून आम्हाला अजून खूप शिकायचे आहे. जेव्हा एखादा हुशार अन् बुद्धिमान क्षेत्ररक्षक त्यांच्या संघात असेल तेव्हा त्यांच्या फिरको गोलंदाजाविरुद्ध आम्ही षटकार ठोकून चालणार नाही. क्रिकेटक्षेत्रातील एका कल्पक बुद्धिवंताकडून हा किस्सा ऐकता ऐकता सर्वांच्या चेहऱ्यावर हसू फुटले.

सी. के. नायडूंचे एकूण व्यक्तित्वच आश्चर्यजनक अन् लोभसवाणे होते. नेतृत्व असो, फलंदाजी असो, गोलंदाजी असो, क्षेत्ररक्षण असो किंवा त्यांचे भाषण असो; त्यांच्या असाधारण प्रतिभेचा साक्षात्कार झाल्याशिवाय कधीच रहात नसे. इ. सन १९३२ च्या ह्याच इंग्लंडच्या दौऱ्यात त्यांची फुललेली वक्तृत्वकलाही तिथल्या रसिकांना पहावयास मिळाली होती. ह्याच दौऱ्यावर असताना एकदा एक मजेदार घटना घडली. एका इंग्रज महाभागाने मोठ्या सावधपणे त्यांचा एका भाषणात परिचय करून देताना म्हटले –"सी. के. म्हणजे नायडू परिवारातला एक चमकता तारा आहे. श्रीमती सरोजिनी नायडू ह्याही ह्याच नायडू परिवारातील एक असाधारण वक्त्या आहेत." झाले ! लोकांनी सी. कें. चा पिच्छाच पुरविला. त्यांचा आपला एकच प्रश्न – "श्रीमती सरोजिनी नायडू तुमच्या कोण ?" अन् सी. कें.चेही ह्या प्रश्नाला सतत एकच उत्तर होते–"ती एक महापुण्यवान अशी साध्वी स्त्री आहे. आम्ही त्यांच्याच देशाहून आलो आहो."

सन १९३३-३४ मधली गोष्ट आहे. एम. सी. सी. संघ अन् भारतीय संघ ह्यांच्यातील कसोटी सामन्याला सुरवात व्हावयाची होती. त्यांच्या प्रशंसकांनी कसोटी सामन्यांच्या बाबतीतील सी. कें.चा अंदाज काय आहे, हे चाचपण्याचा प्रयत्न केला. सी. के. चटकन उत्तरले, "मित्रांनो, तुम्ही मला मोठ्या अवघड परिस्थितीत टाकले आहे. भारत कसोटी सामना जिंकील, अशी खूप शक्यता आहे; पण एका संघाचा कर्णधार असताना अशी भविष्यवाणी करणे, हे नम्रतेला सोडून होणारे आहे. इंग्रज खेळाडू आपले पाहुणे आहेत, हे आपण कदापीही विसरता कामा नये. त्यांच्या भावना दुखावतील असे आपण काहीही बोलता कामा नये !

वातावरण कितीही बिघडलेले असो, सी. के. नायडू आपल्या अंगच्या हजरजबाबीपणाच्या जोरावर सारेच वातावरण एकदम बदलून टाकीत. त्यात मुसह्यता आणीत.

पराभवाच्या वेळेस तर त्यांचे व्यक्तित्व अधिकच उजळून निघे. ह्याचे कारण एकच अन् ते म्हणजे एक सच्चा खेळाडू म्हणून पराभवाचाही ते हसत-हसत स्वीकार करीत. विनोद करून ते अशा वेळी वेगळी कलाटणी देत. अन् आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा आनंदही द्विगुणित करीत. भारतातील एका क्रिकेटस्पर्धेत होळकर विरुद्ध बंगाल असा सामना होता. सी. के. होळकर संघाचे लोकप्रिय कर्णधार होते. सर्वांनाच वाटत होते की, जय होळकर संघाचाच होणार. तशा घोषणाही काहींनी अगोदर करून टाकल्या. पण प्रत्यक्षात घडले मात्र वेगळेच. तिसऱ्या दिवशी उपहाराच्या वेळी होळकर संघ बंगाल संघापेक्षा काही धावांनीच आघाडीवर होता. अन् एका डावाच्या मानहानीपासून तो संघ जेमतेम वाचला होता. उपहाराच्या वेळी सी. कें.नी साध्या पण गंभीर आवाजात माईकवर सांगितले–"सभ्य स्त्री-पुरुषहो,. - मी माझा पराभव कबूल करावा, म्हणून तुम्ही मला इथे बोलाविले आहेत, हे मी जाणतो. परंतु मी जे आता सांगणार आहे, त्याने तुम्हाला चांगलाच








अनुक्रमणिका

धक्का बसेल. माझे खेळाडू आता लवकरच एका मजबूत फलंदाजी असलेल्या संघाचा अवघ्या अकरा धावात धुव्वा उडविण्याची करामत करून दाखविणार आहेत. मी सांगतोय त्या अंदाजाला तुम्ही हसाल. पण ते किती काळ? थोडयाच अवधीत माझे म्हणणे तुम्हाला मानावेच लागेल."

एक क्षण! सी. कें.च्या ह्या वक्तव्याने चहूकडले वातावरण एकदम सुन्न झाले. सी. कें.नी त्याही क्षणाची मौज लुटली. अन् मग दुसऱ्या क्षणीच त्यांनी बंगालचे कर्णधार कुचविहारचे महाराज ह्यांना उद्देशून माईकवरून म्हटले, "माननीय महाराज, एक अवघड सामना आपण जिंकलात, त्याबद्दल मी आपले मन:पूर्वक अभिनंदन करतो."

मला वाटते, सी. कें.ची ही सहजप्रवृत्ती कुणीही सहजासहजी विसरू शकणार नाही.

पुष्कळांची अशी समजूत आहे की, सी. के. नायडू हे केवळ ठोकाठोकी (हिटर) करणारेच होते. पण असे मानणे चूकच ठरेल. अन् दुसरे असे की, नायडूंच्यावर असे विधान करण्याने अन्यायदेखील होईल. सन १९३३–३४ मध्ये इंग्लंड संघाविरुद्ध १५० मिनिटांच्या खेळात नायडूंनी काढलेल्या अवघ्या सदतीस धावाच ह्या विधानातला फोलपणा सिद्ध करावयास पुरेशा आहेत. त्यांच्या बचावात्मक खेळाचा तो एक नमुनाच मानावा लागेल. एवढेच काय, एकदा तर त्यांना एके ठिकाणी चौकार किंवा षटकारविरहीत शतक लावून दाखविण्याचे आव्हान देण्यात आले होते. अन् कुणाकडून मात करून घेण्याची सवय नसलेल्या नायडूंनी ते पटकन स्वीकारलेदेखील. दिल्या शब्दाला नायडू त्या सामन्यात जागले अन् त्यांना आव्हान देणारे मात्र मूग गिळून स्वस्थ बसले. कुठे इंग्लंडमधला तो एका क्रिकेट मोसमातला छत्तीस षटकारांचा उच्चांक नि कुठे हा बचावात्मक खेळ!

कर्नल सी. के. नायडूंची सहनशक्ती अपरिमित होती. त्यांच्या व्यक्तित्वाचे एक आश्चर्यजनक वैशिष्ट्य म्हणजे जेव्हा जेव्हा ते खेळताना घायाळ होत तेव्हा तेव्हा ते त्यानंतर दुप्पट जोमाने खेळत अन् आपल्या अदम्य साहसाचे दर्शन घडवीत. 'ओव्हल'च्या सुप्रसिद्ध मैदानावर खेळल्या गेलेल्या इंग्लंडविरुद्धच्या तिसऱ्या कसोटी सामन्यात भारताला सामना वाचविण्यासाठी नव्वद धावांची आवश्यकता होती. नायडू मोठ्या वीराने नि आत्मविश्वासपूर्वक खेळत होते. तेवढ्यात त्यावेळचा प्रख्यात वेगवान गोलंदाज गबी अॅलन् ह्याचा एक उसळता चेंडू त्यांच्या कपाळावर आदळला. क्रिकेट रसिकांना वाटले, ह्या जबरदस्त तडाख्याने ह्या महान वीराच्या जीवनाची इतिश्री होते की काय! त्या कल्पनेने रसिक हळहळले. पण थोडा वेळच. डोळयाचे पाते लवते न् लवते तोच मस्तकाला मालिश करीत सी. के. उठले नि खेळावयास सिद्ध झाले. त्यांच्या आयुष्यातील ऐतिहासिक महत्त्वाच्या ८१ धावा त्यांनी त्याच वेळी नोंदविल्या होत्या.

एक उत्कृष्ट क्षेत्ररक्षक म्हणून ज्यांच्या नावाचा क्रिकेटविश्वात दबदबा होता असे कर्नल सी. के. नायडू हे 'विस्डेन्'चा सन्मान मिळविणारे पहिलेच भारतीय खेळाडू. अन् हा सन्मान त्यांना प्राप्त झाला तोदेखील कुठल्याही परगण्याच्या (कौंटी) संघातर्फे न खळता! एका अर्थाने कर्नल नायडू हे आदर्श भारतीय आत्म्याचे प्रतिरूप होते.

धार्मिक आन्हिके उरकण्यासाठी नायडू दिवसाचा ठराविक काळ देत असत. त्याबाबतीतला त्यांचा नियमितपणा स्पृहणीय असाच होता. दररोज ते नियमाने पूजनअर्चन करीत. त्यांना कुणीतरी एकदा सहज प्रश्न केला होता—"तुमच्या जमान्यातले खेळाडू नि आजच्या जमान्यातले खेळाडू ह्यांच्यामध्ये आलेल्या परिवर्तनाबद्दल आपले काय मत आहे?"

ते चटकन उत्तरले—"भगवान राम नि कृष्ण ह्यांच्यामध्ये तुलना करण्याची का तुमची इच्छा आहे?"

त्यांच्या त्या प्रतिसवालातच पृच्छकाच्या प्रश्नाचे उत्तर सामावलेले होते! त्यांचा तो प्रतिसवाल ऐकताना त्यांच्या डोळ्यात टवटवीतपणे दिसणारी चमक नि चेहऱ्यावरले विजयी हास्य त्या प्रश्नकर्त्याला मारून गेली असलीच पाहिजे.

असा होता हा भारतीय क्रिकेटचा महान सम्राट!

* * *

(पान १४ वरून—**विडा** ...)

"मागं एकदा आमच्याकडचं पान तुम्हाला देईन असं म्हटलं होतं. आहे याद? आज घेऊन आलेय पान. त्यानं तुमचं तोंड कसं रंगल पहा!"

"पान आनंदानं खाईन जहानआरा. पण आता फार उशीर झालाय. मोहबतीची तार तुटायचा मोका जवळ आलाय!"

"असं काय बोलताय!"

"बादशहा मला जिंदा ठेवणार नाहीत असं एकतोय"

"कोण म्हणतं?"

"इथले कैदी सांगताहेत"

"त्यांचं काय ऐकताय?"

"बरं. पान तर देशील?"

जहानआरानं पानं दासीच्या हातात दिलं. चलाख दासीच्या कपाळावर घर्मबिंदू उभे राहिले. पण तिनं मन घट्ट केलं. अख्तरला विडा देताना तिचा हात थरथर कापत होता. अख्तरच्या हातात विडा गेला अन् त्यानं तोंडात टाकलाही.

पान खाता खाता अख्तरचा तोल जाऊ लागला. जहानआरा कावरीबावरी झाली. तो असं का करतोय त्याचं कारण तिला उमगेना. धडपडत तो खाटेजवळ गेला. त्यानं आरसा काढला. आपलं तोंड पाहिलं. ते लालीलाल झालेलं पाहून तसाच ठेचाळत तो दरवाजाजवळ येऊन मोठ्या मिनतवारीनं अडखळत जहानआराला बोलला——

"जहानआरा, शादी पक्की झाली की विडा धाडीन असं तू म्हटलं होतंस! आठवतं? अग माझं पान कधी रंगत नाही. पण या तुझ्या विडचात विलक्षण जादू दिसतेय. माझं तोंड नुसतं लालीलाल झालंय. हा सारा आपल्या मोहबतीचा प्रभाव आहे म्हटलं!" जहानआराचे डोळे मात्र अश्रूंनी चिंब झाले होते.

धडधडत अख्तर खाली कोसळला तेव्हा त्याची लाश जहानआराच्या दृष्टीस पडली. अख्तरचा देह काळाठिक्कर पडला होता. ते दृश्य पाहून जहानआराची शुद्ध हरपली. दासीची मान खाली होती अन् विडचाची जादू यशस्वी केल्याबद्दल तिला इनाम देण्यासाठी शहाजहान पाठमोरा उभा होता.

● ● ●

अनुक्रमणिका









# सोनियाचा दिवस

-शां. पां. कणेकर

**......वा! वा! अमृत्या हे काय विचारतोस? तुझी अकल्पित भेट म्हणजे मोठ्ठाच योग म्हणायचा --अगदी 'सोनियाचा दिवस'च म्हणा ना! आणि तुझ्यावरोवर हे कोण आहेत आणखी?...**

**पात्रे**

| | |
|---|---|
| **कमळाकर--** | एक इस्टेट ब्रोकर / कमिशन एजंट |
| **सुनीता--** | कमळाकरची वायको |
| **मोहन--** | कमळाकरचा भागीदार |
| **अमृते--** | एक्साईज् सुपरिटेण्डण्ट |
| **सावंत--** | एक्साईज् इन्स्पेक्टर |
| **लाड--** | एक्साईज् इन्स्पेक्टर |
| **एक स्वयंसेविका--** | तरुणी |
| **एक कार्यकर्ता--** | मध्यम वयाचा गृहस्थ |

स्थळ कमळाकरच्या फ्लॅटचा एक हॉल. वाजूला एक खोली. एका वाजूस आतल्या वाजूला जाण्या-येण्यासाठी पॅसेज्. हॉलमध्ये येण्यास एक दरवाजा. दुसऱ्या वाजूस एक खिडकी. हॉलमध्ये सोफा-सेट, सेंटर पीस्, खुर्च्या, वाजूला टेवल.

(पडदा वर जातो तेव्हा कमळाकर आतल्या खोलीत दारासमोर उभा असून, अंगात पांढऱ्या जाड कापडाचे जाकीट चढवीत असतो. जाकिटाला ओळीने कप्पे-खिसे-शिवलेले असतात. त्या खिशात चौकोनी विस्किटांच्या आकाराचे तुकडे ठेवलेले असतात. त्यामुळे ते जाकीट थोडे जड वाटते. अंगात ते जाकीट घातल्यावर कमळाकर त्या जाकिटाचे वंद वांधतो. छातीवरील एक दोन खिशांतून ते चौकोनी पिवळ्या रंगाचे तुकडे तो थोडेसे वर काढून पुन्हा आत खुपसून ठेवतो. खुषीत असतो. नंतर वर शर्ट घालतो, वर जाकीट घालतो व आतले जाकीट, शर्टवरोवर ठाकठीक वसल्याची खात्री करून घेतो व नंतर कोट चढवतो. सारे काही ठीक जमल्याची खात्री झाल्यावर वाहेर येतो. दार वंद करतो, कडी लावून कुलूप लावतो, चावी विजारीच्या खिशात ठेवतो. पुन्हा एकदा छातीवर, कमरेवर, पाठीवर हात फिरवतो. गाणं गुणगुणत हॉलमध्ये फेऱ्या मारीत असतो.)

**कमळाकर**:--चला, ठीक जमलंय् सारं आता. थोडा वेळ वसून मोहनची वाट पाह्यची नि तो आल्यावर मनसुखलालकडे आजची ही शेवटची खेप टाकायची. त्याचा सारा हिशोव आज पुरा करून



अनुक्रमणिका

टाकला की मग तो त्रिजलाल शेट. –चायला मजा आहे या बिस्किटांच्या धंद्यात . . . सुनीता – अग सुनीता – सुनीता––

**सुनीता** :––(आतून)––आले, आले––

**कमळाकर** :––अग आले आले काय करतेस ? वेळ होतोय नं अशानं!! कॉफी आण लवकर.

**सुनीता** :––( कॉफीचा ट्रे हातात घेऊन प्रवेश करते ) आटोपलंच पहा माझं सारं––

**कमळाकर** :––म्हणजे ? कुठं बाहेर जायला निघालीस की काय–एवढं नटून थटून ?

**सुनीता** :––इश्श असं काय करता ? प्रदर्शनाला जायचंय नं आज ?

**कमळाकर** :––आज ? प्रदर्शनाला ?

**सुनीता** :––होऽऽ तुम्हीच नाही का म्हणालात त्या दिवशी की, उदघाटनाच्या दिवशीच जाऊ आपण त्या प्रदर्शनाला म्हणून ? आजच तर आहे उद्घाटन.

**कमळाकर** :––अग, पण मला आधी आठवण तरी करायचीस.

**सुनीता** :––आठवण काय करायचीय त्यात ? पेपरात तर पुढच्याच पानावर आलंय् सारं छापून.

**कमळाकर** :––ते खरं ग. पण पेपर उघडायला तरी मला फुरसत झालीय् का आज ? पाहतेस तर खरी, गेले चार दिवस मी किती कामात असतो सारा दिवस ते.

**सुनीता** :––तुमचं म्हणजे असंच––

**कमळाकर** :––झालं–रागावलीस ! खरं म्हणजे असं आहे सुनीता, उद्घाटनाच्या दिवशी जाऊच नाही माणसांनी प्रदर्शनाला.

**सुनीता** :––का ते ? एवढी सगळी माणसं जातात ती ?

**कमळाकर** :––अग ती सारी जातात आपलंच प्रदर्शन करायला. मोठी मोठी माणसं येतात–मंत्री येतात–त्यांच्या बायका येतात–त्यांच्या पुढं पुढं नाचायला जातात ! –दुसरं काय!!?

**सुनीता** :––म्हणजे रद्दच झाला कार्यक्रम–असंच न ?

**कमळाकर**:–– रद्द नाही. जायचं म्हणजे जायचंच आपण या प्रदर्शनाला. पण थोड्या दिवसांनी जायचं. गर्दी पण कमी असेल–निवांतपणं बघता येईल सारं.

**सुनीता** :––बरं–तसं तर तसं–काय करणार.

**कमळाकर** :––बघ, रागावलीस तू–

**सुनीता** :––रागावले नाही–पण तुमच्या या साऱ्या धावपळीचं मला वाईट वाटतं बघा. अलिकडं तर अगदी कहर झालाय नुसता. रोज संध्याकाळी कंबर दुखते म्हणता नि मोहन आला की त्याच्या-बरोबर निघताच बाहेर.

**कमळाकर** :––स्वतंत्र धंदा म्हटला की हे चालायचंच. काम निघालं की धावपळ–नसलं की घरातच सारा वेळ–

( बेल वाजते )

**सुनीता** :––आले वाटतं तुमचे पार्टनर–मोहनराव. (दार उघडते–दारात एक तरुणी दिसते)

**तरुणी** :––नमस्कार.

**सुनीता** :––नमस्कार–या नं आत. कोण आपण ?

**तरुणी** :––मी किनई–इथल्या भगिनी मंडळाची सेक्रटरी आहे मी. मुद्दाम आलेय तुम्हाला भेटायला–बरं झालं तुमचे मिस्टरपण घरी आहेत ते. नमस्कार हं मिस्टर कमळाकर.

**कमळाकर** :–नमस्ते–नमस्ते (ती बसते) हं बोला काय एवढं खास काम काढलंत ते.

**तरुणी** :– काम तसं काही फारसं मोठं नाही. आमच्या भगिनी मंडळासाठी किनई एक छोटीशी इमारत बांधायचा विचार आहे सगळ्यांचा. त्याच्यासाठी फंड कलेक्ट करायचाय् – पण नुसती डोनेशन्सच काय मागत हिंडायचं लोकांजवळून ? म्हणून आम्ही काय ठरवलंय् – एक नाट्योत्सवच करायचा–मंडळाला चार पैसेही मिळतील नि पैसे देणाऱ्यांची करमणूकही होईल. कशी वाटते ही आयडिया तुम्हाला ?

**कमळाकर** :––हो बा–छानच आहे की. आयडिया.

**तरुणी** :––मला वाटलंच तुम्हाला पसंत पडेलच ही कल्पना–मग फाडू दोन तिकीटं ?

**सुनीता** :––पण काय दराची आहेत तिकिटं ?

**तरुणी** :––फार नाही–अगदी कमी दराची आहेत तसं म्हटलं तर. पन्नास, चाळीस, तीस नि वीस. चार नाटकं तर आहेत चांगल्या नावाजलेल्या मंडळींची–नि पाचवं आहे आम्ही मंडळातल्या मुलींनी बसवलेलं.

**सुनीता** :––(कमळाकरकडे पाहून ) घेऊ या का आपण वीसवाली दोन ?

**कमळाकर** :––काय वीसची ? कुठच्या कुठं लांब बसावं लागेल–नाही का हो ?

**तरुणी** :––हो नं–नि खरं म्हणजे आणली पण नाहीत मी ती तिकिटं–दोनच तर रोऽऽज् आयांनी नि बायांनीच घेऊन टाकली ती सारी.

**सुनीता** :––मग तीसची द्या दोन.

**कमळाकर** :––अग कसली वीस अन् तीस करीत बसतेस सुनीता एखाद्या कारकुनाच्या बायकोसारखी !

**तरुणी** :––नाहीतर काय ? तुमच्यासारख्यांसाठी नाहीतच ती तिकिटं. पन्नासचीच घ्याल तुम्ही मला वाटलं होतं–

**कमळाकर** :––बरोबर आहे तुमचा अंदाज–द्या तुम्ही पन्नासाची दोन. ( विजारीच्या खिशातून पैशाचं पाकीट काढतो–पैसे देतो–ती तरुणी तिकीटं देते )

**तरुणी** :––थँक्स हं–पण आलं पाह्यजे हं तुम्ही जरूर–मी आहेच. म्हणा तिथं–बरं मी येते आता.

**कमळाकर** :––अग सुनीता–यांना काही चहा कॉफी–

**तरुणी** :––(सुनीतेस) ए नको गडे आता काही. येईन मी पुन्हा सावकाशीनं–आच्छा बाय् बाय्–येते हं कमळाकर. (जाते)

**सुनीता** :––कशाला घेतलीत एवढी पन्नासाची तिकिटं ?

**कमळाकर** :––ऐकलं नाहीस तू–अग आपल्याबद्दल अपेक्षाच असतात तशा.








**सुनीता** :––काही नाही–कामापुरता चोंबडेपणा करतात झालं. मागाहून कोणी विचारीत नाही.

**कमळाकर** :––अग जसा देश तसा वेश करावा लागतो. एवढ्या मोठ्या फ्लॅटमध्ये राह्यचं–ॲम्बेसॅडरनं जायचं-यायचं नि तिकिटं काय वीस न् तीसची घ्यायची ?

**सुनीता** :––म्हणजे काय, पैसा असेल तर तो वाटेल तसा उधळून टाकायचा वाटतं ?



**कमळाकर** :––अग, हा पैसा म्हणजे आळवावरचं पाणी. असाच खर्चायचा असतो–ब्लॅकचा पैसा.

**सुनीता** :––(चपापून) ब्लॅकचा पैसा ?

**कमळाकर** :––अग अशी ओरडू नकोस वेड्यासारखी–धंद्यातली ट्रेड सिक्रेटस् असतात एक एक.

**सुनीता** :––मला वाटलंच असं काहीतरी असेलसं.

**कमळाकर** :––अग धंदा म्हणजे काय कारकुनाची नोकरी वाटली की काय तुला–बसले आपले पगार एके पगार करीत !

**सुनीता** :––पण खरं म्हणजे मला आपलं वाटतं की तुमची ती पोलीस सब्इन्स्पेक्टरची नोकरी होती तीच बरी होती या धंद्यापेक्षा. काय कमी होतं त्या नोकरीत ?

**कमळाकर** :––हे मात्र तुझं ट्रू-मच हं सुनीता. एवढा पैसा मिळवतो–हा फ्लॅट घेतला, दागिने केले तुला–ते काय त्या नोकरीत जमलं असतं–इतक्या लवकर ?

**सुनीता** :––ते खरं हो, पण केवढी धावपळ चालू असते एक एक वेळी तुमची. सारखी तुमची अन् त्या मोहनची खलबतं चालतात त्या तुमच्या ऑफिस-रूममध्ये. त्या खोलीची एक चावी तुमच्याजवळ नि एक त्या मोहनजवळ. चावी राह्यली बाजूला पण मला तिकडं यायची सुद्धा चोरी–म्हणे गृहलक्ष्मी !

**कमळाकर** :––म्हणजे काय, आमच्या ऑफीसची चावी पण तुझ्या-जवळ द्यायची ? कामाचे कागद उघड्यावर पडले की वाजलेच आमचे बारा ! (बेल वाजते) बघ बरं कोण आलं ते–मोहनच असणार.

[सुनीता दार उघडते–अमृते व त्याच्या मागोमाग सावंत व लाड आत येतात.]

**कमळाकर** :––(थोडा नाराज दिसतो पण लगेच सावरतो) कोण अमृते ? अरे वा–वा–वा, आज इकडे कुठं उगवलास ? (सुनीता घरात जाते)

**अमृते** :––सहज आलो होतो या बाजूला–म्हटलं बघावं डोकावून आहेस की नाही ते.

**कमळाकर** :––छान, छान. बस नं आल्यासारखा. (अमृते बसतात–हातातील काठी खाली जमिनीवर ठेवतात) मला वाटलं त्या दिवशी तू आपली पूर्वीसारखी मारलीस थाप–येईन म्हणून. किती? तीन-चार महिने झाले असतील नाही, आपण अंधेरीला भेटलो त्याला ?

**अमृते** :––पण, आहे की नाही माझी मेमरी चांगली–बरोबर काढला की नाही पत्ता शोधून ?

**कमळाकर** :––वा, वा. ते काय विचारता ! तुझी आजची भेट–म्हंजे मोठ्ठा योगच म्हणायचा–अगदी ‘सोनियाचा दिवस’च म्हणायचा. नि हे कोण ?

**अमृते** :––हे माझ्या हाताखालचे इन्स्पेक्टर्स–हे सावंत नि हे लाड. थोडं काम निघालं या बाजूला–म्हटलं चला–

**कमळाकर** :––( कंबर पाठ हाताने दावीत ) काम ? म्हणजे कुठं धाडबीड घालायचीय् की काय आज ?

**अमृते :**––छे रे, कसली धाड अन् कसलं काय! सांगितलं नं तुला त्या दिवशी की मी आहे स्टॅटिस्टिक्स् ॲण्ड इन्टेलिजन्स् शाखेचा सुप्रीन्टेण्डण्ट म्हणून. आमचा आपला सगळा आकड्यांचा खेळ–आता कसली माहिती गोळा करायची कामगिरी दिलेय्––

**कमळाकर :**––कसली माहिती ?

**अमृते :**––अरे आपल्या देशाच्या विकासाला पैसा पाहिजे नं? मग पैसा कुठून आणणार त्यासाठी? एक एक नवीन नवीन तयार होणाऱ्या वस्तूंवर ड्यूट्या बसवायच्या झालं. त्यासाठी आता निरनिराळ्या कारखान्यांची माहिती गोळा करायचीय्.

**कमळाकर :**––अस्सं होय! मग ठीक आहे––

**अमृते :**––बरं सावंत, तुम्ही चला आता तुमच्या कामगिरीवर. मी बसतो इथंच थोडा वेळ. जाताना इकडे येऊन जा–मी असेनच इथं–नाही तर त्या मघाच्या हॉटेलात. समजलं?

**सावंत :**––यस् सर.

**अमृते :**––सगळं व्यवस्थित करायचं हं सांगितल्याप्रमाणं.

**लाड :**––यस् सर.

**अमृते :**––कोणाला कसला संशय येता कामा नये––

**सावंत :**––नो सर.

**अमृते :**––चला तर मग (दोघे सलाम करून जातात)

**कमळाकर :**––अग सुनीता–ए सुनीता (सुनीता येते) ही तुझी वहिनी–सुनीता–बरं का अमृत्या. नि हाच तो माझा लहानपणापासूनचा मित्र अमृते.

**अमृते :**––नमस्कार वैनी (सुनीता नमस्कार करते) मलल्याच वेळी आलो त्याचा राग नाही नं आला वैनी? आमचं हे असंच–वेळी अवेळी जाणं–येणं!

**सुनीता :**––इश्य, राग कसला आलाय् त्यात.

**अमृते :**––नाही–पण तुमचा बाहेर जाण्याचा बेत आहेसं दिसतोय, तुमच्या या पोषाखावरून.

**कमळाकर :**––पोषाखाचं काय–नेहमीचंच आहे हे.

**अमृते :**––म्हणजे तू काय घरात रोज सूट घालून बसतोस असा?

**कमळाकर :**––सुनीतेच्या कपड्याचं बोलतोय मी. मला आता बाहेर जायचंय थोड्या वेळानं एका पार्टीकडे.

**सुनीता :**––अय्या पण हे काय! भावजींना नुसतं बोलतच ठेवायचं की काय? काय आणू भावजी? चहा की कॉफी? की सरबत चालेल?

**कमळाकर :**––त्याला काय–काहीही चालेल. जे मिळेल ते घ्यायचं हा त्याचा स्वभाव पहिल्यापासून नि आता तर काय–एक्साईज खातं–

**सुनीता :**––इश्य काय हे!

**अमृते :**––याचं काय ऐकता वैनी–यानं कोणाची चाहा केलेय्–दिसेल त्याच्यावर सरबत्ती उडवायची एवढं याला माहीत. तुम्ही आपली कॉफीच आणा वैनी.

**कमळाकर :**––बघ–आहे की नाही मिडस्त? अगदी आपुलकीनं वाटेल ते मागून घेणार.

**सुनीता :**––बसा हं भावजी–मी आता आणते बघा छानपैकी नेस्-कॉफी करून. (जाते)





अनुक्रमणिका

**अमृते** :––हं, मग काय म्हणतोय तुझा व्यापार, कमळाकर ?

**कमळाकर** .––(कंबर दावीत–ताठ वसत) व्यापार ? व्यापार-विपार नाही वुवा आपला. आमचा आपला ब्रोकर अन् कमिशन एजंटचा धंदा.

**अमृते** :––अरे हो विसरलोच–कमिशन एजंट नाही का ?

**सुनीता** :––(प्रवेश करीत) कॉफीवरोवर काय आवडेल भावजींना? वटाटे पोहे करू की विस्किटं ?

**कमळाकर** :––(कंवर दावीत–थोडा चपापत) विस्किटं ?

**अमृते** :––का ? विस्किटं काय तुम्ह्याचसाठी आहेत की काय ?

**कमळाकर** :––नाही, म्हटलं विस्किटं कसली तुला–चांगली गरम गरम भजी–नाहीतर वटाटे पोहे––

**अमृते** :––नको वैनी, आज मला विस्किटंच पाह्यजेत. वटाटे वडे पुढे कधी तरी. (सुनीता जाते)

**कमळाकर** :––तुझी नोकरी काय म्हणते अमृत्या––

**अमृते** :––आपलं काय वुवा, पगार एके पगार. कुठं काय थोडा चहापाणी वाहेर मिळेल तेवढंच.

**सुनीता** :––(कॉफीचा ट्रे घेऊन येते) तुम्ही पण यांच्यावरोवर होतात नं भावजी पोलिसमध्ये ?

**कमळाकर** :––अग, हा पोलिस ट्रेनिंगपर्यंतच होता माझ्यावरोवर–पोलिसमधे नाही काही. याला घेतलंच नाही पोलिसात शेवटी.

**सुनीता** :––म्हणजे ?

**कमळाकर** :––अग याला ट्रेनिंग पुरं होण्यापूर्वीच मिळाला डिच्चू. ट्रेनिंगला असताना एकदा काय झालं, स्वारीनं घोड्याला मारली टाच––घोड्यानं दिली याला टांग नि पडली स्वारी घोड्यावरनं. झालं–संपलं याचं ट्रेनिंग तिथंच. तिथून मग चार महिने इस्पितळात.

**सुनीता** :––नि मग ?

**अमृते** :––मग काय करणार ? केला अर्ज सेन्ट्रल एक्साईजमधे.

**कमळाकर** :––तिथं झाले हे सिलेक्ट. तिथं तर काय–पूर्वी शिपायांचे सुद्धा इन्स्पेक्टर व्हायचे. कारकुनीला लायक नसला एखादा–की झाला इन्स्पेक्टर. वशिला मात्र पाह्यजे. मग हा तर काय ? इन्टर पास नि त्यातून थोडसं पोलिस ट्रेनिंग घेतलेला.

**अमृते** :––तिथं झालो इन्स्पेक्टर. डायरेक्ट रिक्रूट.

**सुनीता** :––छानच झालं की.

**कमळाकर** :––नि याची पहिली नेमणूक कुठं, माहीत आहे ? जयसिंगपूरला–तंवाखूचा साहेव; जयसिंगपूर. मी इकडे पोलीस सब्-इन्स्पेक्टर मुंबईला. आता झाली दोन वर्षं–स्वारी मुंबईला आलेय्–सुप्रीन्टेण्डण्ट म्हणून वढतीवर.

**सुनीता**:––आय्या, मग किती मजा असेल नाही भावजी ?

**अमृते** :––मजा नाही नि काही नाही.

**कमळाकर** :––नाही कशी ? आताच पहा नं–कामाला म्हणून निघाला, दोन इन्स्पेक्टर आणले वरोवर–त्यांना लावले पिटाळून कामाला नि आपण वसलाय् इकडं गप्पा मारीत. मेहनत करायची हाताखालच्या लोकांनी नि क्रेडीट घणार हे साहेव.

**अमृते** :––हे तुझं काहीतरीच वरं का कमळाकर. अरे, हाताखालच्या लोकांनी गोळा करायची स्टॅटिस्टिक्स–नि मग आम्ही इन्टेलिजन्स वापरायचं–म्हणून तर आमच्या व्रँचचं नांव आहे स्टॅटिस्टिक्स ॲण्ड इन्टेलिजन्स व्रॅन्च !

**सुनीता** :––काही जरी असलं तरी मजा आहेच भावजी तुमची–वेताचं काम–ठराविक पगार–

**कमळाकर** :––नि जवावदारी शून्य.

**अमृते** :––शहाणाच आहेस. पुष्कळ वेळा धोकाही असतो, माहीत आहे ? जरा एखाद वेळी धोरण चुकलं, अवधान सुटलं की खलास. शिवाय पगार एके पगार–वोनस नाही नि कमिशन नाही.

**कमळाकर** :––दे ठोकून काहीतरी झालं. मी पाह्यलेत तंवाखूचे साहेव नाशिकला. साला वखारीत साहेव आला की कोण धावपळ ! पान काय, चहा काय, सिगारेट काय–काही विचारू नको. नि मजा काय माहीत आहे का सुनीता; साहेवापुढं सिगारेटचं पाकीट नि काड्याची पेटी केली की साहेवांनी ती सरळ खिशात टाकायची वरं का.

**अमृते** :––ही आमची नुसती वदनामी हं वैनी–आज काल साले लायसनदार एवढे हुशार झालेत की तेच शिकवितात आम्हाला कायदा. जरा काही कमी जास्त झालं की खरडलं दहा पैशाचं पोस्ट कार्ड. मग झाली इकडं इन्क्वायरी सुरू. जावजवाव, मेमो, एक्स्प्लेनेशन, चार्जशीट–काही विचारू नका.

**कमळाकर** :––हीच साली तुमच्या त्या सरकारी नोकरीची मोठी कटकट. सालं तळं राखायचं न् काय पाणी नाही चाखायचं ?

**अमृते** :––पोलिसात तू चाखलं वाटतं पाणी ?

**कमळाकर** :––मग काय सोडतोय की काय ! डॉक्वर असताना तर चांगलीच मजा मारली–नि तिथंच भेटला एक गुरू. मग सोडली नोकरी नि हा धंदा पत्करला. इथं कसं कोणाचं एक नाही. दोन नाही. डोकं वापरावं. पैसा मिळवावा. (वेल वाजते) वघ वरं सुनीता मोहनच असेल आलेला–वराच वेळ झाला त्याला यायला (सुनीता दरवाजा उघडण्यास जाते)

**अमृते** :–कोण मोहन ?

**कमळाकर** :––माझा भागीदार या कंपनीचा (एक गृहस्थ येतात. खादीच्या पोषाखातील एक कार्यकर्ता–गळ्यात पिशवी)

**कार्यकर्ता** :––माफ करा हं– भलत्याच वेळी येऊन तुम्हाला त्रास देतोय––

**कमळाकर** :––ते तर खरंच–पण काय काम काढलंत इतकं तातडीचं ?

**कार्यकर्ता** :––त्याचं असं आहे, हे पूरवीर येतात नं अलिकडं, त्यामुळं कित्येक लोक घरादारांना मुकतात. त्यांच्यासाठी निधी गोळा करायचा नि तो मुख्य मंत्र्यांच्या स्वाधीन करायचा अशी योजना आहे आपल्या या वाडीतल्या नेत्यांची.

**कमळाकर** :––हं म्हणजे फंडगुंडाचा धंदा ! घेतली झोळी की चालले फिरवीत.

**सुनीता** :––अहो आपल्या वाडीतले हे एक कार्यकर्ते आहेत. तो वस्-स्टॉप झालाय् नं नवीन, तो यांच्याचमुळं–शिवाय ते दूध केन्द्र–

**अमृते** :––अशा कामाला तू मदत केलीच पाह्यजेस कमळाकर. तुमच्या सारख्यांनी नाही करायची मदत तर काय कारकुनांनी ?

**कमळाकर** :––पण आता ही वेळ नाही. तुम्ही असं कराल का, उद्या दुपारी या–मी ठरवतो काय करायचं ते. देऊन टाकू समजलं ?

**कार्यकर्ता** :––वरं, उद्या येतो, काय करणार ? (जातो)

**अमृते** :––काय हे कमळाकर, अरे मदत करायची त्याला आज काय न् उद्या काय ? विनाकारण त्या विचाऱ्याला पुन्हा पुन्हा खेपा मारायला लावणार तू.

**कमळाकर** :––अरे तुला कळणार नाही माझी आयडिया. काय करणार आहे मी माहीत आहे ? मी जाणार सचिवालयातच रक्कम घेऊन. वरोवर घेऊन जाणार आहे कॅमेरामन्. मुख्यमंत्र्याना ती रक्कम स्वतः देणार–त्यावेळी फोटो घेतला जाईल ! दुसऱ्या दिवशी पेपरमध्ये तो फोटो छापून आणायचा–पेपरवाल्यांना चार चारले की झालं. झटपट प्रसिद्धी.

**सुनीता** :––मघाशी कशी चटकन् शंभर रुपयाची घेतलीत ती तिकिटं !

**अमृते** :––कसली तिकीटं ?

**सुनीता** :––अहो, मघाशी एक फटाकडी आली होती नाटचोत्सवाची तिकीटं घेऊन.

**अमृते** :––मग वरोवर. पोरींच्या वावतीत हा पूर्वीपासून असाच हळवा. आमच्या कॉलेजात इलेक्शनं व्हायची नं ? तर पोरीच्या वाजूनं कॅन्व्हासिंग करायला ही स्वारी तयार.

**कमळाकर** :–अमृत्या–ही नुसती नालस्ती चालवली आहेस हं माझी–मित्रद्रोह–

**अमृते** :––मित्र झालास म्हणून काय झालं ? खोटे मुखवटे काढून टाकलेच पाह्यजेत. (कमळाकर पुन्हा कंबर पाठ दावतो) अरे पण कमळाकर, मी मघापासून पाहतोय तुझी कंबर दुखतेय की काय ?– अगदी ताठ वसलायस अन् एक सारखा कंबर दावतोयस तो. काय सायटिका–लंवॅगोसारखं काय झालंय् की काय ?

**कमळाकर** :––हे पण शिकलास की काय, औषधांवर ड्यूटी वसल्यापासून ?

**अमृते** :––शिकायला कशाला पाह्यजे ? आमचे धाकटे वधू आहेत मेडिकल रीप्रझेंटेटिव्ह. त्यांची सारखी चाललेली असते वटवट या रोगांची नि त्यावरच्या औषधांची.

**सुनीता** :––पण भावजी, काही असलं तरी यांनी औषध-पाणी करायला पाह्यजे की नाही हो ? अलिकडे थंड हवेमुळे रोज संध्याकाळी यांची कंबर दुखते. मग हा सूट घालतात नि वसतात कंबर दावत. त्यांचा भागीदार आला की मग जातात कामाला–रात्री आल्यावर मग वरं वाटतं म्हणतात. तुम्ही तरी सांगा आता (घरात जाते)

**अमृते** :––पाहा रे बावा. उगीच ढकलाढकल करू नकोस किडनी-फिडनीसारखं नसतं लचांड लागायचं मागे. यायचं असलं तर चला जाऊ डॉक्टरकडे.

**कमळाकर** :––हिच्या सांगण्याचं काय घेतोस मनावर अमृते. अरे खरं सांगायचं तर रोज मला कामाला वाहेर जावं लागतंच; पण नंतर परत येताना मी इलेक्ट्रीक ट्रीटमेंट घेऊन येतो. हिला कुठं माहीत आहे ?

**अमृते** :––आज पण जायचंय तुला ?

**कमळाकर** :––हो तर, मोहन आला की निघायचं, का ?

**अमृते** :––नाही, अनायसा आलोय तर आणखी एक काम करून जावं म्हणतो. सहज आठवण झाली आत्ताच.

**कमळाकर** :––मला वाटलंच तू काही तरी काम काढून आला असशील म्हणून. अरे नाही म्हटलं तरी चार पावसाळे पोलिस खात्यात घालवलेत् मी. वोल काय काम आहे ते. करून टाकू चटकन्.

**अमृते** :–त्या प्रेमकुंजात कोणी प्रेमलाल नावाचा माणूस राहतो का ?

**कमळाकर** :––हो राहतो, त्याचं काय ?

**अमृते** :––त्याच्यावर आमच्या साहेबांचा थोडा संशय आहे. तो स्मगलर आहे म्हणे.

**कमळाकर** :––कोण प्रेमलाल स्मगलर ? आता मात्र खरोखरच अकलेचं दिवाळं वाजलेलं दिसतंय तुझ्या साहेबाच्या. प्रेमलाल-सारखा पापभिरू, प्रामाणिक नि देवभोळा माणूस दिसणार नाही जवळपास.

**अमृते** :––वरून साळसूद वाटणारी माणसं आतून कोण असतील ते सांगणं कठीण असतं, कमळाकर. 'मुखमे राम वगल मे सुरी' असं असतं काहींचं. आता तू म्हणतोस तसं असलं तर फारच चांगलं होईल. चांगली फजिती होईल आमच्या साह्यबाची.

**कमळाकर** :––जाऊ दे, तुला काय करायचंय ? तुझ्या तर ब्रॅन्चचं हे काम नाही नं ?

**अमृते** :––तसं मला काहीच करायचं नाही. सहज माहिती मिळालीच तर साहेबाला सांगायची. तेवढाच चांगला शेरा मिळेल. दुसरं काय ? प्रमोशनला उपयोगी पडल.

इंडिकेटचे 'सावध' क्रिकेट !

१९७२

भारतीय क्रिकेटचा आ-र्श !

**कमळाकर** :–– मग काय करायचं म्हणतोस तू ?

**अमृते** :––जमलं तर त्याच्यावर दोन दिवस पाळत ठेवावी म्हणतो–इथूनच.

**कमळाकर** :––इथून काय दिसणार ! त्याचा ब्लॉक आहे पलिकडच्या बाजूला–त्याची मोटार आली–गेली हेही दिसणार नाही इथून.

**अमृते** :––मग आता ?

**कमळाकर** :––त्याच्या बाजूलाच माझ्या ओळखीचा एक माणूस राहतो–त्याला विचारून पाहू ?

**अमृते** :––चालेल–पण त्याला काही कळता कामा नये. हं.

**कमळाकर** :––विचारीन त्याला तो रात्री आल्यावर. (घड्याळात पाहतो) अरे बापरे बराच उशीर झाला, आता एवढ्यात मोहन यायलाच पाहिजे.. .अरे सगळंच मुसळ केरात–कामाच्या कागदाची बॅग आतच राह्यली वाटतं. जपून उठतो–खोलीचं कुलूप उघडतो–दार उघडून आत जातो–दार आतून बंद करून घेतो. बाहेर अमृते गाणे गुणगुणत इकडे तिकडे फेऱ्या मारतो. खिशातून सिगारेट लायटर बाहेर काढतो, त्यातला कापूस पटकन काढून खिडकीतून बाहेर टाकून देतो. कमळाकर हळूच दार उघडतो. अमृतेला दिसणार नाही अशा बेताने विजारीच्या खिशातील पिस्तूल हळूच थोडेसे बाहेर काढून पुन्हा आत ठेवतो–सिगारेट तोंडाने बरून अमृते ते रिकामे लायटर पेटवून पाहतो–नंतर टेबलाचे खण उघडून पाहतो.)

**कमळाकर** :––(दरवाजाला कुलप लावून चावी खिशात ठेवीत येतो) काय पाह्यजे तुला अमृते. विनाकारण टेबलाचे खण का विचकटतोस ?

**अमृते** :––हे लायटर सालं पेटत नाही–म्हटलं काड्याची पेटी आहे का पाहावं कुठं. तुला काय वाटलं ?

**कमळाकर** :––काही नाही–पण दुसऱ्याकडे जाऊन त्याच्याकडे अशी वाचकटावाचकट करणं बरं नाही.

**अमृते** :––तुझी ट्रेड सिक्रेट असली तरी माझ्यापासून भीती बाळगायचं कारण नाही कमळाकर.

# प्रेरणा

चित्रकार **द. ग. गोडसे** यांचा 'दीपावली'च्या दिवाळी अंकातील या लेखमालेच्या 'शिवरायांचे लिहिणे कैसे ?' हा पहिला लेख वाचून अनेक रसिक वाचकांनी आणि विचारवंतांनी पत्रे पाठवून स्वागत केले. त्याच लेखमालेतील उत्कंठा वाढविणारा दुसरा लेख जानेवारी १९७१ च्या अंकात प्रसिद्ध होईल.

**कमळाकर** :––बरं चल जाऊ दे–तुला सिगारेट ओढायची आहे नाही का ? सुनीता–ए सुनीता––

[बेल वाजते–सुनीता बाहेर येते.]

कडी काढ नि याला पेटी आणून दे ग जरा.

[सुनीता दार उघडते. मोहन आत येतो–सुनीता आतून काड्याची पेटी आणून अमृतेला देते व आत जाते. अमृतेला तिथं पाहून मोहन थोडा चपापतोच. तो कमळाकरकडे चौकस बुद्धीने पाहतो. अमृते सिगारेट ओढीत असतो. कमळाकर मोहनला खुणेने दिलासा देतो –]

**कमळाकर** :––किती वेळ झाला मोहन, धंद्यात अशी दिरंगाई बरी नाही. चल लवकर तुझे कपडे कर. कागद वगैरे घे नि निघ लवकर. (मोहन त्या ऑफिसरूमचे कुलुप काढून दरवाजा उघडतो. आत जाऊन दरवाजा लावून घेतो. अमृते सिगारेट ओढण्याचा प्रयत्न करतो. सिगारेट खाली पडते) साली ही सिगारेट पण विथरली बघ. चला आता जावं–तुला पण जायचंच–मग येईन उद्या त्या कामासाठी –अच्छा (मोहन त्या खोलीतून बाहेर येतो–कुलुप लावून चावी खिशात ठेवतो–आता त्याचं चालणं ताठ असतं) नि हे पाहा कमळाकर, तुझ्या त्या कंबरदुखीकडे आधी नीट पहा. धंदा धंदा करून प्रकृतीची खराबी करून घेऊ नकोस. बरंय् वहिनी नमस्ते (सुनीता येते. नमस्कार करते आणि आत जाते. अमृते दरवाजापर्यंत जातो–हळूच कडी काढून परत येतो. दरम्यान कमळाकर बॅग्ज् उघडतो. तो आणि मोहन आपसात हळुहळू काही तरी बोलत असतात.) अरे, आमची ही यक्षिणीची कांडी इथंच राह्यली पडून. (जमिनीवर ठेवलेली काठी उचलतो.) तुम्ही पण निघणार काय रे आता इतक्यात ? निघणार असलास तर बरोबरच जाऊ.

**कमळाकर** :––नाही–थोडा वेळ आहे. व्यवहाराचे हे कागद पाहतो नि मग निघतो–

**अमृते** :––बरं, (पायाखाली मघाची ती सिगारेट दिसते) या सिगारेटनं माझा हिरमोड केला बघ. चांगली जिरवली पाहिजे हिची दुसरी सिगारेट ओढून. (सिगारेटचं पाकीट काढतो–मघाशी टेबलावर ठेवलेली काड्याची पेटी घेतो.) तुमचं चालू द्या. मी त्या खिडकीजवळ जाऊन सिगारेट ओढतो–तोपर्यंत आमची ती दुक्कल आली तर ठीक–नाही तर मी निघतोच. (मोहन आणि कमळाकर एका बाजूला कागदपत्रं पाहात असतात.)

**मोहन** :––(खिडकीजवळ उभ्या असलेल्या अमृतेकडे बोट दाखवून–पण नजर हातातील कागदांकडे ठेवून) हे काही बरं नाही दिसत इथं, कमळाकर.

**कमळाकर** :––अगदी हार्मलेस आहे–काही काळजी करू नकोस तू त्याची. मी पूर्ण सावधगिरी घेतलेली आहे, समजलास ! (विजारीच्या खिशावरून हात फिरवतो.)

**मोहन** :––तसा मीही सावध आहे रे (तोही विजारीच्या खिशावरून हात फिरवतो.) पण मला आपलं वाटतं की, त्याच्यात नुकसान आहे आपलंच.








अनुक्रमणिका

[अमृते खिडकीतून बाहेर रस्त्याकडे पाहत असतात. सिगारेट तोंडात धरून कांडे उजळतो–लक्ष रस्त्याकडेच असतं–हातातील कांडे जळत असते]

**अमृते** :––काय साले माजलेत हे टॅक्सीवाले, आता त्या पोराला मारला असता बघ. (हातातलं कांडे एकदोन वेळा झटकून टाकून देतो.) साल्यांना फांशी दिलं पाह्यजे, वाटेल तशा टॅक्स्या चालवतात ते... (पुन्हा कांडे उजळतो) आयला झालंय् काय त्यांना ? आता हा ट्रकवाला बघ–त्या बाजूला उभ्या असलेल्या मोटारीवरच आदळणार होता. (हातातातील कांडे पेटलेलेच असते–ते पुन्हा एक दोन वेळा खाली वर करतो आणि टाकून देतो–सिगारेट हातातच असते.)

**मोहन** :––अहो तुमची सिगारेट तशीच राह्यली की.

**अमृते** :––खरंच की. (सिगारेट पेटवून हातात धरतो) काही नाही, या मुंबईत माणसांना माणुसकीच नाही. हे बसवाले, टॅक्सीवाले, ट्रकवाले–सारे बेफाम चालवतात वाहनं–चांगली जबर शिक्षा ठोठावली पाहिजे एकेकाला (हातातील सिगारेट खाली वर करीत आवेशानं बोलत असतो.)

**कमळाकर** :– आता तुमच्या खात्याकडे घ्या हा कायदा–एरवी काही जमणार नाही.

**अमृते** :––तसंच काही तरी केलं पाह्यजे–बरं चल जाऊ दे–अच्छा गुड नाइट–विश यू गुड लक्

(तेवढ्यात सावंत आणि लाड दरवाजा उघडून आत येतात–अमृते हळुहळू कमळाकर आणि मोहन यांच्याजवळ आलेला असतो–)

**कमळाकर** :––अँ–हे काय ? दरवाजा कोणी उघडला ? सुनीता –

(सुनीता बाहेर येते. कमळाकर आणि मोहन खिशात हात घालतात तोच अमृते, सावंत आणि लाड यांना इशारा करतात. ते कमळाकर आणि मोहन यांचे हात धरतात.)

**अमृते** :––थांब थांब ओरडू नकोस. मी काढून ठेवली होती कडी. मला माहीत आहे तुम्ही दोघांनी सारी खबरदारी घेतलेली आहे ती. हात वर करा नाही तर (आपल्या खिशातील पिस्तूल बाहेर काढून दाखवितो.) मी घेतलेली ही खबरदारी आहेच. (ते दोघे हात वर करतात.) काढा रे आधी यांच्या खिशातली पिस्तुलं बाहेर (सावंत आणि लाड, कमळाकर आणि मोहन यांच्या खिशातून पिस्तुले बाहेर काढतात, बाजूला ठेवतात.)

**सुनीता** :––भावजी, भावजी–काय चालवलंय्त हे.

**अमृते** :––वहिनी याची कंबरदुखी काय आहे ते पाहतोय–आता बघा रोग बाहेर पडेल. काढा रे यांच्या अंगावरचे कोट न् जाकिट. (सावंत आणि लाड तसे करतात) शर्ट पण. आतील मांजरपाटाची जाकिटं दिसतात. लहान लहान खिसे असलेली–एक दोन खिसे उसवून त्यातून सोन्याची बिस्किटं बाहेर काढतात) ही यांची कंबरदुखी बरं का वैनी. सोन्याची चोरटी आयात करायची–ते सोनं त्या व्यापाऱ्याकडे पोचवायचं–हा यांचा कमिशन एजंटचा धंदा. यातून यांनी हा तुमच्या नावावर ब्लॉक घतला, मोटार घेतली नि तुम्हाला सोन्यानं मढवलीय्.



## ५०० वर भागीदारी

५७७ विजय हजारे व गुल महंमद–बडोदा १९४६–४७
५७४ परॅंक वॉरेल व क्लाईड वॉलकॉट–बार्बेडॉस १९४६
५५५ हर्बर्ट सटक्लिफ व पर्सी होल्म्स–यॉर्कशायर १९३२
५५४ जॉन ब्राऊन व टच्युनिक्लिफ–यॉर्कशायर १८९८
५०२ परॅंक वॉरेल व जॉन गोडार्ड–बार्बेडॉस १९४६

## वैयक्तिक ४०० वर धावा

| | | |
|---|---|---|
| ४९९ | हनिफ महमद–पाकिस्तान | १९५८–५९ |
| ४५२ | डॉन ब्रॅडमन–न्यू साऊथ वेल्स | १९२८–२९ |
| ४४३ | भाऊसाहेब निंबाळकर–महाराष्ट्र | १९४८–४९ |
| ४३७ | पॉन्सफर्ड–व्हिक्टोरिया | १९२५ |
| ४२९ | पॉन्सफर्ड–व्हिक्टोरिया | १९२८ |
| ४२४ | मॅकलॅरेन–लॅंकेशायर | १८९५ |

**सुनीता** :––पण भावजी––

**अमृते** :––आता भावजी बिवजी काही नाही. सोनं स्मगल करणाऱ्या टोळीतले हे दोघं आता सरकारी पाहुणे–यांना ॲरेस्ट करायला वॉरंटस् आणायला या माझ्या इन्स्पेक्टरना मी मघाशी पाठवलं होतं. (सावंत तीन कागद अमृतेच्या जवळ देतो) हं आणि हे तुमच्या ब्लॉकची झडती घ्यायला हे सर्च वारंट.

**सुनीता** :––पण भावजी तुमचे मित्र म्हणून––

**अमृते** :––सरकारी कामात मित्रबित्र काही नाही. वहिनी. सोन्याची चोरटी आयात करणारे हे देशद्रोही. यांना पकडून योग्य ते शासन करायलाच पाह्यजे. हं, आता यांनी खरं खरं सांगून ह्या टोळीचा म्होरक्या कोण, सोनं कसं आणतात, कुठं ठेवतात, त्याचं काय काय केलं हे सारं सांगितलं. तर मग बघू यांना माफीचे साक्षीदार म्हणून काही करता आलं तर–तोपर्यंत हे आता आमचे पाव्हणे ! लाड, जा चार पंचांना बोलावून आण, त्या ऑफिसची झडती घेऊन पंचनामा करायला पाहिज या सगळ्या सोन्याचा. सोनियाचा दिवस आहे आज. खरं नं कमळाकर ?

(कमळाकर आणि मोहन खाली मान घालून उभे असतात, सुनीता रडत डोळे पुशीत असते––लाड जातो–पडदा पडतो.)

* * *

(सूचना :–– या एकांकिकांचे प्रयोग करण्यासाठी लेखकाची परवानगी घणे आवश्यक आहे. काही तांत्रिक माहितीची दिग्दर्शना-साठी जरूर वाटेल त्यासाठी २।१७ सर्वोदय हाऊसिंग सोसायटी, बामणवाडा, (पारला) मुंबई नं –२९ या पत्त्यावर लिहावे.)



—र. गो. सरदेसाई

**...क्रिकेटमुळे नाव मिळते.... नोकरीही मिळते... पण क्रिकेटचा नाद सोडल्याखेरीज क्रिकेटवीराला कुटुंबसौख्य नि मनःस्वास्थ्य लाभणे कठीणच.... त्याचेच हे एक प्रत्यक्ष उदाहरण ...**

# क्रीडा आणि कुटुंबपोषण

इंग्लंडचा सुप्रसिद्ध फलंदाज **टॉम ग्रॅव्हेनी** हा मायदेशाला रामराम ठोकून ऑक्टोबर महिन्यात ऑस्ट्रेलियातील क्वीन्सलंड राज्यात सहकुटुंब रहावयास गेला आहे. तेवीस वर्षे इंग्लिश क्रिकेटची उत्तम सेवा करून, दोन तपे इंग्लंडच्या जनतेची करमणूक करण्यात जीवन वेचल्यावर, वयाच्या चव्वेचाळिसाव्या वर्षी, ग्रॅव्हेनीला मातृभूमी सोडून कुटुंबपोषणासाठी आणि क्रिकेट खेळण्याची हौस भागवून घेण्यासाठी इंग्लंडहून ऑस्ट्रेलियामध्ये जाऊन राहण्याची पाळी आली ही गोष्ट मनाला पीळ पाडणारी आहे! इंग्लंडच्या विजयासाठी तीन तपांपूर्वी शरीराचे पाणी पाणी करून ज्या हॅरॉल्ड लारवूडने ऑस्ट्रेलियाच्या डॉन ब्रॅडमनवर मात करण्यात यश मिळविले होते, त्या लारवूडलाही आज ऑस्ट्रेलियामध्येच जाऊन जीवन व्यतीत करावे लागलेले आहे. आणि आता इंग्लंडच्या क्रिकेटला सतत तेवीस वर्षे भूषणभूत बनून राहिलेल्या टॉम ग्रॅव्हेनीलाही जीवनातील संध्याकाळ सुखाने घालवण्यासाठी ऑस्ट्रेलियाचाच आधार घ्यावा लागत आहे! कौरवांच्या वतीने भारतीय युद्धामध्ये लढून जर्जर होऊन शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्यांच्या मुखात शेवटी गंगोदक पडले ते मात्र ज्याच्याशी भीष्माचार्य लढले त्या अर्जुनाच्या बाणाने; तसाच हा प्रकार म्हणायचा!

ऑस्ट्रेलियाला एकेकाळी क्रीडांगणावर नामोहरण करणारा इंग्लंडचा हॅरॉल्ड लारवूड हा आपल्या पाचही मुलींसह ऑस्ट्रेलियात स्थायिक झालेला आहे. सुखीही झालेला आहे. त्याच्या काही मुलींनी देखील ऑस्ट्रेलियातच आपले संसार आता मांडलेले आहेत. हॅरॉल्ड लारवूडच्या 'शरीरवेधी' गोलंदाजीचा सूत्रचालक मानला गेलेला इंग्लंडचा तेव्हाचा नेता डग्लस जार्डिन यालादेखील पुढं इंग्लंडला रामराम करून ऱ्होडेशियात जमीन खरेदी करून राहाण्याची पाळी आली! याच जमिनीच्या पाहणीसाठी जार्डिन ऱ्होडेशियाला गेला असता तेथील पीतज्वराने त्याला गाठले व शेवटी त्याच आजाराने जार्डिन स्वित्झर्लंडमध्ये निधन पावला. इंग्लंडचा दुसरा एक महान क्रिकेटर वॉल्टर हॅमंड यालादेखील, ऐन उमेदीची वर्षे इंग्लिश क्रिकेट व इंग्लिश जनता यांच्या सेवेत वेचल्यावर, शेवटी दक्षिण आफ्रिकेत दरवान येथे जाऊन राहावे लागले आणि तेथेच त्याच्या जीवनाचा शेवट झाला! डॉ. डब्ल्यू. सी. ग्रेस या महान् खेळाडूच्या अनेक विक्रमांची ज्या वॉल्टर हॅमंडने अनेकवेळा बरोबरी करून अनंत रेकॉर्डस् केली त्या हॅमंडला इंग्लंडने वेशक परागंदा होऊ दिले!

आणि आज 'दुसरा हॅमंड' म्हणून ज्याची कालपरवापर्यंत वाखाणणी होत होती तो टॉम ग्रॅव्हेनीही इंग्लंड सोडून ऑस्ट्रेलियात जाऊन राहिला आहे. आपली बायको, दहा वर्षांचा मुलगा टिमोथी आणि मुलगी यांना घेऊन ग्रॅव्हेनीने क्वीन्सलंडमध्ये नवे घरकुल केलेले आहे. १९४८ ते १९७० अशी तेवीस वर्षे ज्या ग्रॅव्हेनीने इंग्लंड-

मध्ये क्रिकेट खेळण्यापलिकडे दुसरे काहीही केले नाही, त्याला त्याच्या त्या अविराम तपःश्चर्येचे फळ अखेर काय मिळाले? पोटासाठी देशत्याग करून अन्य देशात–क्रिकेटमधील आपल्या शत्रूराष्ट्रात जाऊन जगावे लागत आहे! चव्वेचाळीसाव्या वर्षी ग्रॅव्हेनीवर हा प्रसंग आला याचे कोणाही क्रिकेटरसिकाला खात्रीने वाईट वाटेल. ज्याने आपल्या तेवीस वर्षांच्या क्रिकेट-कारकीर्दीमध्ये प्रथमश्रेणी सामन्यात सर्वांक ४७,३६६ (सरासरी ४६.१०) धावा केल्या, त्याला, पन्नास हजार धावांचे ईप्सित पुरे करण्याला लागणाऱ्या, उरलेल्या २६३४ धावा करण्यापुरतीही संधी इंग्लंडने देऊ नये याचे नवल वाटते! पन्नास हजार धावांचे नवे रेकॉर्ड करून मग क्रिकेट खेळाचा कायमचा निरोप घेण्याची टॉम ग्रॅव्हेनीची इच्छा आहे. दोन तपांच्या प्रदीर्घ सेवेनंतरही ही त्याची महत्त्वाकांक्षा पुरी करण्यास इंग्लंडने त्याला जरूर असलेला दोन-तीन वर्षांचा क्रीडा-काल देण्यास नकार दिलेला आहे!

## ऑस्ट्रेलियाने दिलेला आसरा

ग्रॅव्हेनीने पुष्कळ प्रयत्न केले पण त्याला क्रिकेट खेळून कुटुंब-पोषण करता येईल अशी 'नोकरी' इंग्लंडमध्ये कोठेही मिळाली नाही! दोन तपांच्या अनुभवसंपन्नतेनंतर ग्रॅव्हेनीसारख्या मातब्बर खेळाडूला, नवयुवकांना क्रिकेटचे सशास्त्र शिक्षण देण्याचे तरी काम मिळायला हरकत नव्हती. पण तेथही त्याला नकार मिळाला. 'नॅशनल कोच' (राष्ट्रीय प्रशिक्षक) म्हणून आपली नेमणूक केली जावी असा अर्ज ग्रॅव्हेनीने केला पण त्याला कळविण्यात आले की, 'त्यासाठी शाळामास्तर छाप माणूस हवा'! इंग्लंडमध्ये कोठेही मनासारखी नोकरी न मिळाल्यामुळे अखेर ग्रॅव्हेनीला मातृभूमीला रामराम ठोकून ऑस्ट्रेलियाकडे कूच करावे लागले. तेथे क्वीन्सलँड-मधील ब्रिस्बेन येथील एका क्रिकेट क्लबने त्याला 'प्रशिक्षकाचे' काम दिलेले आहे. त्या क्लबच्या संघातून तो क्रिकेटही खेळेल व जरूर पडली तर क्वीन्सलँडतर्फे ऑस्ट्रेलियाच्या शेफील्ड शील्ड सामन्यातही ग्रॅव्हेनी भाग घेईल. हा त्याचा करार तीन वर्षांचा आहे. इंग्लंडमध्ये एका हंगामात सुमारे तीस प्रथम श्रेणी सामने खेळले जातात, तशी स्थिती ऑस्ट्रेलियात नाही. ऑस्ट्रेलियातर्फे ग्रॅव्हेनी कसोटी सामन्यात कधीच खेळू शकणार नाही आणि शेफील्ड शील्डचे सामने प्रतिवर्षी मर्यादितच असल्याने, सर्वांक पन्नास हजार धावांचे उद्दिष्ट पार पाडण्यास तीन वर्षांचा काल ग्रॅव्हेनीला कितपत पुरेल हा प्रश्नच आहे. पण आज तीन वर्षांसाठी जो करार झालेला आहे, तो ग्रॅव्हेनी व त्याचे कुटुंब यांना तेथील अधिवास सुखाचा ठरल्यास, वाढवला जाण्याचीही शक्यता आहे.

टॉम ग्रॅव्हेनी सर्वांक पन्नास हजार धावांचा पल्ला गाठतो की नाही याला माझ्या दृष्टीने फारसे महत्वही नाही. एम्. सी. सी. च्या प्रवासी संघातून तो यापूर्वी तीन वेळा ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेलेला होता आणि आज तो इंग्लंड सोडून ऑस्ट्रेलियामध्ये स्थायिक होण्यासाठी गेलेला आहे. त्याचवेळी एम्. सी. सी.चा क्रिकेट संघही ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर आहे हा योगायोग लक्षणीय आहे. या संघातर्फे, जरूर पडल्यास व आपणास आमंत्रिल्यास, क्वीन्सलंड क्रिकेट क्लबच्या परवानगीने, आपण कसोटी सामन्यात खेळूदेखील, असे ग्रॅव्हेनी म्हणतो पण तसा प्रसंग येण्याचा संभव नाही हे तोही जाणून आहे. इंग्लंडमधील एम्. सी. सी. आणि अन्य देशातील क्रिकेटचे नियंत्रण करणाऱ्या प्रशासन संस्था यांच्या वृत्तीत, विचारात, व वागण्यात फार मोठे अंतर अनेक वेळा दिसून येते व त्यामुळेच ग्रॅव्हेनीसारख्या उत्कृष्ट आणि उपयुक्त खेळाडूलादेखील, जीवनाच्या अर्धशतकाच्या सीमेवर आल्यावर, 'वंदन तुज मातृभूमि! हे अखेरचे! नकळे तव दर्शन कधि फिरुनि व्हायचे?' असे म्हणण्याची पाळी येते! एम्. सी. सी. ही नियमातील शब्दप्रामाण्याला पवित्र मानून त्यावरहुकूम वागण्याबाबत कटाक्ष ठेवते! पण तसे करताना बदलती परिस्थिती, मानवी जीवन आणि खेळाडूंच्या अडचणी, यांबाबत फारशी सहानुभूती दाखवीत नाही. जुन्या काळातील परिस्थितीला अनुसरून केलेले कायदेकानू नव्या बदलत्या परिस्थितीत बदलेले पाहिजेत याची फारशी जाण एम्. सी. सी.ला दिसत नाही. कायदेकानूंच्या काटेकोर अंमलबजावणीबाबतच्या एम. सी. सी.च्या दक्षतेतूनच टॉम ग्रॅव्हेनीचा सध्याचा देशत्याग जन्माला आलेला आहे असे म्हणणे चूक होणार नाही.

झाले काय की, गेल्या वर्षी (१९६९ मध्ये) वेस्ट इंडीज संघ इंग्लंडच्या छोटचा दौऱ्यावर होता. या संघाबरोबर इंग्लंडचा पहिला कसोटी सामना ओल्ड ट्रॅफर्ड क्रीडांगणावर जूनमध्ये खेळला गेला. या सामन्याचे पहिले तीन दिवस खेळ होऊन त्यात ग्रॅव्हेनीने पहिल्या डावात चार तास खेळून धावा केल्या. चवथा दिवस रविवार असल्याने त्या दिवशी सामना बंद होता. सोमवार-मंगळवारी सामना पुढे खेळला जाऊन तो इंग्लंडने दहा गडी राखून जिंकलाही. या विजयाला ग्रॅव्हेनीचा हातभार लागला असताही त्यानंतर पुढील तीन कसोटी सामन्यात त्याला खेळायला घ्यायचे नाही असे एम. सी. सी. ने ठरविले आणि त्यामुळे ग्रॅव्हेनीच्या कसोटी सामन्यातील खेळावर शेवटचा पडदा पडला! कारण, मधल्या रविवारच्या रजेच्या दिवशी ग्रॅव्हेनी दुसऱ्या एका खाजगी सामन्यात एक दिवस खेळला. एम. सी. सी.च्या कायद्याप्रमाणे कसोटी सामन्यात खेळण्यासाठी निवडलेल्या खेळाडूने, नियोजित कसोटी सामना संपेपर्यंत दुसऱ्या कोणत्याही सामन्यात खेळता कामा नये. ग्रॅव्हेनीने हा नियम मोडला म्हणून त्याला पुढील तीन कसोटी सामन्यात घ्यायचे नाही असे शासन एम्. सी. सी.ने केले!

शिस्तभंगाला शासन एवढ्याच काटेकोर दृष्टीने पाहिले तर हे सारे रास्त आहे असे म्हणावे लागेल. विशेषतः इंग्लंडच्या निवड समितीचे अध्यक्ष अलेक बेडसर यांनी उपरोक्त नियम ग्रॅव्हेनीच्या नजरेस आणून देऊन त्याच्या रविवारच्या सामन्यात खेळण्यास मना केले असताही ग्रॅव्हेनी खेळला, म्हणून तर त्याच्या शिस्तभंगाला अधिकच उग्र स्वरूप आले. तीन कसोटी सामन्यांतून वगळल्यानंतर, ग्रॅव्हेनीचा नंतरचा फार्म पाहून त्याला पुनः कसोटी सामन्यात घ्यायचे








की कसे ते निवड समिती त्यावेळी ठरवील असे वेडसरनी म्हटले होते; पण त्यात 'सदा मुखी मंगल बोलवावे' यापलीकडे काही अर्थ नव्हता. कारण, ग्रॅव्हेनीची चाळिशी तेव्हा उलटून गेलेली होती व इंग्लंड नवतरुणांचा संघ उभारण्याच्या उद्योगात होते. ग्रॅव्हेनी त्या वेळपर्यंत १९५१ ते १९६९ या वीस वर्षांच्या कालावधीत ७९ कसोटी सामने खेळलेला होता व त्याने त्यात ४८८२ सर्वांक धावाही (सरासरी ४४.३८) केलेल्या होत्या. इंग्लंडतर्फे तो सर्व देशांविरुद्ध खेळलेला होता, तद्वत सर्व देशांच्या दौऱ्यावरही तो जाऊन आलेला होता. त्यामुळे क्रिकेटबद्दल ग्रॅव्हेनीच्या मनात गाढ कृतज्ञतेची भावना वागत आहे. याच खेळाने त्याला तेवीस वर्षे पैसा, प्रसिद्धी व लोकप्रियता मिळवून दिलेली होती. व याच खेळाने त्याला जगभर प्रवासही घडवून दिलेला होता. सर्व देशांतून त्याला मित्रही मिळवून दिलेले होते.

## कीर्ती व पैसा यांचे व्यस्त प्रमाण

ह्या सर्व गोष्टी क्रिकेटने ग्रॅव्हेनीला दिल्या खऱ्या पण त्याची एक वेगळीच किंमत त्याला द्यावी लागली होती. कोणत्याही कलेच्या नादी लागलेल्या अव्वल दर्जाच्या कलावंताला ज्याप्रमाणे आपल्या कलेच्या पायी आपल्या कुटुंबाकडे अनेकदा दुर्लक्ष करणे भाग पडते तशीच स्थिती क्रिकेटराचीही होते. विशेषतः टॉम ग्रॅव्हेनीसारख्या लौकिकवान क्रिकेटराला तर कुटुंबाच्या सुखस्वास्थ्याकडे लक्ष देण्यास पुरेशी फुरसत मिळणे मुश्कील होते व ज्या मानाने नावलौकिक वाढतो व कुटुंबाचा विस्तार होत जातो, त्यामानाने क्रिकेटरला पैसा जास्त मिळत नाही. त्यामुळे तर वाढती जबाबदारी व घटते उत्पन्न या कात्रीत अनेक क्रिकेटर्स सापडून त्यांची मोठी शोचनीय अवस्था होते. आज सर्वच देशांचे राहाणीमान अफाट वाढलेले आहे. त्यामुळे क्रिकेटराचा खर्चही वाढला आहे; पण त्या मानाने त्याचे उत्पन्न वाढलेले नाही. किंबहुना आज जगामध्ये जेवढे म्हणून लोकप्रिय खेळ आहेत त्या सर्वांत धनप्राप्तीच्या दृष्टीने क्रिकेटइतका दरिद्री खेळ दुसरा कुठलाच नसेल!

जगातल्या अन्य काही लोकप्रिय खेळातील नामवंत खेळाडूंना होणाऱ्या प्राप्तीची येथे थोडी माहिती देतो म्हणजे क्रिकेटरांच्या तुटपुंज्या प्राप्तीची कल्पना येईल. आज जगात ब्राझिलचा **पेले** हा अत्यंत लोकप्रिय फूटबॉलर आहेत. फूटबॉल खेळून त्याला सध्या दरसाल साडेतेवीस लक्ष रुपये प्राप्ती होते! अशी प्रचंड प्राप्ती होत असल्यामुळेच त्याने सिगारेटस् तयार करणाऱ्या कारखानदारांनी आपल्या मालाच्या जाहिरातीसाठी पेलेला उपयोगात आणण्यासाठी देऊ केलेला साडेपाच लाख रुपयांचा करार त्याने सरळ केराच्या टोपलीत टाकला! अमेरिकेचा लोकप्रिय फूटबॉलर **ज्यो नमाथ** याचेही फूटबॉल खेळून होणारे वार्षिक उत्पन्न **साडेएकवीस** लाख रुपयांवर आहे. इटालीचा विख्यात फूटबॉल **खेळाडू रिवा** हा काही वर्षांपूर्वी एका मोटार गॅरेजमध्ये काम करणारा **केवळ** एक सामान्य छोकरा म्हणून जीवन ढकलीत होता. पण तो **फूटबॉलच्या** क्रीडांगणात उतरला आणि आज तो विश्वविख्यात खेळाडू ठरलेला असून, वर्षाला अकरा लाख रुपये त्याची प्राप्ती झालेली आहे! फूटबॉलमध्ये आठवड्याला अठराशे ते साडेबावीसशे रुपये ज्यांचा नियमित पगार आहे असे अनेक फूटबॉलर्स आज इंग्लंडमध्ये आहेत. बॉबी मूर, बॉबी चार्लटन, गार्डन बॅन्कस् यासारख्या विश्वविख्यात फूटबॉलरांची प्राप्ती तर विचारायलाच नको. फूटबॉल खेळणाऱ्या सामान्य तरुणाला इंग्लंडमध्ये जेवढी प्राप्ती होते तेवढे उत्पन्न इंग्लंडमधील नामवंत कसोटीवीर क्रिकेटरांनाही होत नाही. म्हणूनच कोणताही तगडा तरुण आता इंग्लंडमध्ये क्रिकेटकडे न वळता फूटबॉल खेळणेच पसंत करतो.

फूटबॉलप्रमाणेच टेनिसमध्येही नामवंतांना सपाटून पैसा मिळतो. रॉड लेव्हर या ख्यातनाम टेनिसपटूचे सध्याचे वार्षिक उत्पन्न साडेबारा लाख रुपयांवर आहे. याच प्रमाणात इतरही अनेक नामांकित टेनिसपटू आज पैसा कमावीत आहेत. गोल्फच्या खेळातही टोनी जॅकलीन वर्षाला अठरा लक्ष रुपये कमावतो. बेन होगन हाही नामांकित गोल्फ खेळाडू अशीच लाखांनी कमाई करतो. मुष्टियोद्धे हे देखील सध्या लाखांनी पैसे मिळवीत आहेत. अमेरिकेतील काही राज्यांच्या उत्पन्नाचा प्रमुख वाटा मुष्टियुद्धांच्या 'रिंगणा'तूनच उगम पावतो. त्यामुळेच मुष्टियुद्धाला मनाई करण्यास अमेरिकेची तयारी नाही. भारतात घोड्यांच्या शर्यती ह्या सरकारी उत्पन्नाची फार मोठी बाब असल्यामुळे कोणतेही सरकार घोड्यांच्या शर्यती बंद करू धजत नाही; उलट जेथे शर्यती नसतील तेथे सरकार त्या चालू करू देते! तशीच अवस्था मुष्टियुद्धाबाबत अमेरिकेची आहे! फूटबॉल, टेनिस, गोल्फ, या खेळाइतके नसले तरी ॲथलेटिकस्मध्येही अनेक प्रवीणांचे उत्पन्न धनाढ्यांना लाजविणारे असते. पैसा, प्रसिद्धी व लोकप्रियता या दृष्टीने इतर कोणत्याही खेळांमध्ये माणसाला जो लाभ घडतो त्याचा शतांशही बिचाऱ्या क्रिकेटराच्या नशिबी नसतो. म्हणूनच टॉम ग्रॅव्हेनीसारखी प्रकरणे अधूनमधून उद्‌भवतात!

गेल्या वर्षी ओल्ड ट्रॅफर्ड येथील कसोटी सामन्यात खेळत असतानाच ग्रॅव्हेनी मधल्या रविवारच्या रजेच्या दिवशी दुसऱ्या एका क्रिकेट सामन्यात खेळला हा त्याने शिस्तभंग केला म्हणून त्याला पुढल्या तीन कसोटी सामन्यातून वगळण्याची शिक्षा एम्. सी. सी.ने फर्मावली! कायद्याच्या काटेकोर दृष्टीने हे सर्व बरोबरच झाले हे खरे; पण याला मानवी जीवनाचीही एक बाजू आहे हे लक्षात घेतले पाहिजे. ज्या दुसऱ्या सामन्यात ग्रॅव्हेनी खेळला तो सामना साहाय्य (बेनिफिट) देण्यासाठी आयोजिलेला होता व त्यात फक्त एक दिवस खेळण्यासाठी त्याला अठरा हजार रुपये मिळाले! इंग्लंडमध्ये क्रिकेट खेळणाऱ्यांची आर्थिक दुरवस्था शोचनीय आहे. ग्रॅव्हेनी आज तेवीस वर्षे क्रिकेट खेळत आहे, पण त्याच्या प्राप्तीचे प्रमाण इतके अल्प आहे की, तेवढ्या उत्पन्नात कुटुंबपोषण अशक्य होऊ लागले. आज ग्रॅव्हेनी ऑस्ट्रेलियात राहावयास गेला तेथे त्याला जो पगार मिळणार आहे, त्याच्या निम्म्यानेही प्राप्ती त्याला इंग्लंडमध्ये होत नव्हती! एम्. सी. सी. खेळाडूंना स्वतः भरपूर

मेहनताना देत नाही व त्यांना अन्य मार्गांनी पैसा मिळविण्यास मात्र हरकत करते. आज इंग्लंडचा जो क्रिकेट संघ ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर गेलेला आहे त्यातील सर्वच खेळाडू इंग्लंडचे प्रातिनिधिक म्हणून निवडलेले वेचक व विख्यात खेळाडू आहेत ना? पण त्यांना एम्. सी. सी. काय देते? वीस आठवड्यांच्या या दौऱ्यासाठी प्रत्येक खेळाडूला फक्त साडे नऊशे पौंड मिळावयाचे आहेत! आणि ग्रॅव्हेनीला फक्त एका दिवसाच्या बेनिफिट सामन्यात खेळण्यासाठीच गेल्या वर्षी एक हजार पौंड रोख मिळाले!

क्रिकेटरांना कोणकोणत्या दिव्यातून जावे लागते याची कल्पना क्रिकेटचे केवळ सामने पहाणाऱ्यांना अथवा त्या सामन्यांचे वृत्तपत्रीय वर्णन वाचणारांना कधीच येऊ शकणार नाही।! यॉर्कशायरचा टेलर नामक एक तरुण खेळाडू होता. त्याचा एका प्रेयसीशी वाङ्‌निश्चयही झाला होता; पण पुढे त्याला इंग्लंडच्या राष्ट्रीय संघात जागा मिळाली व त्याला गावोगावी क्रिकेट खेळण्यासाठी हिंडावे लागले. या त्याच्या विरहाने त्याची प्रेयसी एवढी संतापली की, तिने ठरलेले लग्न मोडून टाकले! दोन वर्षांपूर्वी एम्. सी. सी.चा एक क्रिकेट संघ वेस्ट इंडीजच्या दौऱ्यावर गेला होता. या दौऱ्यावर मिडिलसेक्सचा अष्टपैलु खेळाडू फरेड टिटमस हाही होता. तो एके दिवशी तेथे समुद्रस्नान करीत असताना जवळूनच गेलेल्या एका विहारनौकेच्या विजेच्या पंख्याने बिचाऱ्याच्या पायाची सगळी बोटेच कापून टाकली! या आपत्तीतूनही टिटमस धैर्याने क्रिकेट खेळत आहे पण कसोटी सामन्यातून मात्र त्याला एम. सी. सी. ने कायमचा वगळला आहे! अशी आणखीही उदाहरणे देता येतील. पण त्याची जरूरी नाही. कमी पैसा घेऊन जास्त आपत्ती सोसायला लावणारा असा हा क्रिकेट खेळ असल्यामुळे कौटुंबिक जबाबदारी-पायी अनेकाना या खेळापासून दूर रहाणे अलीकडे भागच पडत आहे.

**ग्लूस्टरशायर संघाकडून अन्याय**

'क्रिकेट की कुटुंब' ही जटिल समस्या टॉम ग्रॅव्हेनीच्या रूपाने उग्र स्वरूपात समोर उभी राहिलेली आहे. ग्रॅव्हेनी हा देखणा पण दुर्दैवी क्रिकेटर वाटतो. ग्लूस्टरशायर कौन्टीशी झालेले त्याचे भांडण आणि एम. सी. सी.शी झालेला त्याचा तंटा यामुळे त्याच्याबद्दल सहानुभूती वाटते. ग्लूस्टरशायरतर्फे तो १९४८ पासून १९६० पर्यंत तेरा वर्षे खेळत होता. या कौन्टीने त्याला १९५९ व ६० मध्ये संघ-नेताही नेमला होता. पण १९६१ मध्ये त्याच्याऐवजी टॉम पघ (Pugh) नामक एका हौशी नवतरुणाला ग्लूस्टरशायरने नेता नेमला. हा आपला अपमान समजून ग्रॅव्हेनीने ग्लूस्टरशायरला राम-राम ठोकला व तो १९६२ पासून वूस्टरशायरतर्फे खेळू लागला. तेथेही तो प्रभावी ठरला व फलंदाजीमध्ये वाकबगार म्हणून त्याची वाखाणणी झाली; पण एम. सी. सी.ने त्याला शिस्तभंगाबद्दल शासन केल्यापासून तेथेही त्याचे बस्तान जमेना. त्यामुळे उतार वयात त्याला मायदेश सोडून परागंदा होण्याची पाळी आली.

ग्रॅव्हेनीच्या या दुर्दैवाला मूळ व मुख्य कारण एम. सी. सी.चा क्रिकेटविषयक विचित्र दृष्टिकोण हे आहे. १९५१ ते १९६९ या वीस



## हे फल काय मम तपाला?

मुंबईत एक विक्रमी सामना १९४२–४३ च्या मोसमात खेळला गेला. दोन्ही संघांच्या पहिल्याच डावात मिळून धाव-संख्या झाली १३७६. हा जागतिक विक्रम होय. या प्रदर्शनी सामन्यातील संघांची नांवे होती बंगाल वादळ संघ व विजापूर दुष्काळ संघ. आपल्या नावाला अनुरूप असा झंझावाती खेळ करून बंगाल वादळ संघाने थोडथोडक्या नाही तर ७०३ धावा झळकावल्या. (विजय हजारे २६४ व गुलमहमद १४४ ही त्यातील प्रमुख आकडेवारी) विजापूर दुष्काळ संघाने प्रत्युत्तर दिले ते पण सुरवातीला नावाला अनुरूपच. म्हणजे धावांचा दुष्काळ व भरभर गडी बाद होत त्यांच्या ५ बाद फक्त १२८ धावा झाल्या; पण उरलेल्या खेळाडूंनी शर्थ केली आणि देवधर १०६, रांगणेकर १३८ व इब्राहीम २५० यांनी सिंहांचा वाटा उचलला. तरी सुद्धा त्यांचे भगिरथ प्रयत्न थिटे पडले व प्रतिपक्षावर आघाडी मिळविण्याचे श्रेय ३० धावांनी अपुरे पडले. या संघाच्या ६७३ धावा झाल्या.

६०० धावांची आघाडी मारूनसुद्धा प्रतिपक्षावर मात करण्यात अयशस्वी झालेल्या संघाचे उदाहरण म्हणजे अलिकडेच (१९६४ साली) मॅंचेस्टर कसोटी सामन्यात इंग्लंडने केलेल्या ६११ धावा. कारण तत्पूर्वी ऑस्ट्रेलियन संघाने ६५६ धावांची मजल मारल्यामुळे तो संघ आघाडीवर राहिला.

साधारणतः कसोटी सामन्यात ५०० वर धावा करणारा संघ हरत नाही असे आढळते. पण त्यातही असे प्रसंग घडले आहेत की पहिल्या डावात ५०० च्या वर धावा करूनही १९२८–२९ मध्ये ऑस्ट्रेलियामध्ये पाचव्या कसोटी सामन्यात इंग्लंडला शरणागती पत्करावी लागली तर १९५२–५३ मध्ये दक्षिण आफ्रिकेविरुद्ध पाचव्याच कसोटी सामन्यात ऑस्ट्रे-लियाला पराभवाची नामुष्की मान्य करावी लागली.

'फॉलो ऑन'नंतर ५१० धावा करून सुद्धा भारताने १९६७-मध्ये इंग्लंडविरुद्ध पहिल्या कसोटी सामन्यात मार खाल्ला.

**ही झाली विफल प्रयत्नांची सांघिक कर्मकहाणी: वैयक्तिक पराक्रमाची अशीच दास्तान आहे. त्यात भारताचे विजय हजारे व विनू मानकड यांचा अग्रक्रमांक लागेल.**

हजारेने १९४३ च्या पंचरंगी जातीय सामन्यात शेष संघातर्फे खेळून हिंदू संघाविरुद्ध ३०९ धावा केल्या आणि संघाच्या एकूण धावा किती तर ३८७! त्यापैकी १८ इतर धावा. म्हणजे संघाच्या धावांपैकी ८० प्रतिशत (टक्के) धांवा एकट्याच्या हा एक जागतिक विक्रम आहे. आणि या धावा पंचरंगी सामन्यातील वैयक्तिक उच्चांक होय. शिवाय हे सर्व करताना हजारेने उपाहारापूर्वी शतक काढण्याचा पराक्रमही केलेला होता. ३०० च्या वर धावा काढणाऱ्या खेळाडूंच्या संघाचा पराभव हे जागतिक क्रिकेटमधील एकमेव उदाहरण आहे. या सर्व आटापिट्यानंतरसुद्धा विजयप्राप्तीचे प्रयत्न विफल ठरल्याने बिचाऱ्या हजारेला 'हे फल काय मम तपाला' असे वाटल्यावाचून राहिले नसेल.

१९४७-४८ मध्ये ऑस्ट्रेलियात चौथ्या कसोटी सामन्यात दोन्ही डावात शतक फडकविणाऱ्या विजय हजारेचा संघ एक डावाने सामना हरवूनच बसला..

विनू मानकडचा अतिरथीचा पराक्रम असाच विफल झाल्याचा प्रसंग म्हणजे १९५२ मधील लॉर्ड्सचा कसोटी सामना. दोन्ही डावात ७२ व १८४ धावा काढून पहिल्या डावात ५ व दुसऱ्या डावात २ बळी घेणारा हा कसोटीवीर जवळजवळ सतत पाच दिवस क्रीडांगणावर झुंजत होता. पण परिणाम काय तर भारताचा कसोटी सामन्यातील आणखी एक पराभव.

भारताचा एक जुना खेळाडू वझीर अल्ली याने एकदा रणजी करंडकाच्या अंतिम सामन्यात त्या वेळचा विक्रम केला. त्याने २२२ नाबाद केल्या; पण त्याचा संघ बंगाल विरुद्ध रणजी करंडक हस्तगत करू शकला नाही.

इंग्लंडचा आघाडीचा फलंदाज फॅग (हल्ली हा कसोटी पंच म्हणून काम करतो. चकर्सविरुद्ध त्याची कामगिरी प्रसिद्धच आहे) याने १९३८ मध्ये दोन्ही डावात द्विशतके (२४४ व २०२) काढण्याचा जागतिक विक्रम केला त्यानंतर कोणीही खेळाडू अजूनपर्यंत हा विक्रम करू शकलेला नाही. तरीसुद्धा त्यावर्षी ऑस्ट्रेलियाविरुद्ध एकाही कसोटी सामन्यात त्याला प्रवेश मिळाला नाही.

४४३ नाबाद धावांचा भारतीय वैयक्तिक उच्चांक करणाऱ्या भाऊसाहेब निंबाळकर याने या उच्चांकाबरोबरच दुसऱ्या विकेटच्या भागिदारीचा जागतिक विक्रम (भांडारकरबरोबर ४५५ धावा) प्रस्थापित केला होता. पण या खेळाडूला भारतातर्फे एकाही अधिकृत कसोटी सामन्यात खेळण्याची संधी मिळू शकली नाही.

उच्चांक, विक्रम व वैयक्तिक भीम पराक्रम यांनी यशोमंदिर गाठले जातेच असे नाही. सुखी माणसाच्या सदऱ्यासारखी यशाची गुरुकिल्ली अजून कोणालाच सापडलेली नाही. आणि या अनिश्चिततेच क्रिकेटच्या यशाचे व लोकप्रियतेचे रहस्य सामावलेले आहे.

वर्षांच्या कालावधीत ग्रॅव्हेनीला फक्त ७९ कसोटी सामन्यातच खेळण्याची संधी मिळाली. 'विस्डेन'ने ज्या खेळाडूची 'दुसरा हॅमंड' म्हणून स्तुती केली होती त्याला कसोटी सामन्यात घेण्याबाबत एम. सी. सी. फारशी उत्सुक नसे! कारण, ग्रॅव्हेनीचा क्रिकेटकडे पाहाण्याचा दृष्टिकोण व क्रिकेट खेळण्याची त्याची पद्धती दोन्ही एम्. सी. सी.ला पसंत नव्हती! स्वभावतः ग्रॅव्हेनी हा चेंडू चोपणारा आक्रमक वृत्तीचा खेळाडू होता; चेंडू टोलवीत बसून वेळ काढणारा 'कातडी बचाववादी खेळाडू नव्हता!' लेन हटनच्या नेतृत्वाखाली कसोटी सामन्यात खेळण्याची ग्रॅव्हेनीवर पाळी आली तेव्हा हटन व ग्रॅव्हेनी यांच्या वृत्तीतील व क्रीडापद्धतीतील हा फरक स्पष्ट झाला! हटनने ग्रॅव्हेनीच्या आक्रमक, शैलीबाज फलंदाजीला बांध घालून त्याला 'सुरक्षित' खेळ खेळण्यास भाग पाडले. त्यामुळे ग्रॅव्हेनीची स्वाभाविक शैली आणि क्रिकेटमधील अधिकाऱ्यांचे दडपण यांच्यातील द्वंद्वात बिचारा ग्रॅव्हेनी होरपळून गेला! धड हेही नाही नि धड तेही नाही अशी त्याची अवस्था झाली. त्यामुळे कसोटी सामन्यांतील त्याचे आसनही अस्थिर झाले! तो कसोटी सामन्यातून खेळला खरा, पण त्याला गुणानुसार सतत संधी मिळाली नाही. केव्हा त्याला घेतले जाई, मधूनच त्याच्यावर बहिष्कार पडे! त्याच्या बाबतीत एम. सी. सी.चे धोरण धरसोडीचे होई. त्यामुळेच कसोटी सामन्यांपेक्षा स्वतःच्या 'बेनिफिट' सामन्याचे महत्त्व त्याला जास्त वाटले असेल!

ग्रॅव्हेनीच्या क्रीडाकारकीर्दीत नियतीचा नाच मोठा विचित्र रीतीने चाललेला दिसतो! ग्लुस्टरशायरतर्फे तो १९४८ मध्ये प्रथमच प्रथमश्रेणी सामन्यात खेळू लागला आणि त्याच्या चमकदार खेळामुळे त्याला तीनच वर्षात १९५१ मध्ये कसोटी सामन्यात घेतले गेले. पण तेथे लेन हटनने त्याच्या स्वाभाविक क्रीडागतीला पायबंध घातला. 'विस्डेन' वार्षिकाने १९५२ मध्ये त्याची आपल्या 'क्रिकेट पंचायतना'त निवड केली. प्लेफेअर या क्रिकेट वार्षिकाने तर १९५१, ५२ व ५७ या तिन्ही वर्षी 'सर्वोत्कृष्ट क्रिकेटर' म्हणून ग्रॅव्हेनीकडे बोट दाखवले आणि १९६२ मध्ये त्या सालच्या उत्कृष्ट पाच क्रिकेटवीरांत त्याची निवड इंग्लंडचा एक माजी संघनेता नॉर्मन यार्डली याने केली होती. ग्रॅव्हेनीचा वेळोवेळी असा गौरव होत गेला खरा, पण त्याच्या भाग्यस्थानावर कोणत्या तरी दुष्ट ग्रहाची नजर असावी अशी शंका येते. कारण ज्या ज्या वेळी त्याचा सन्मान होतो त्या त्या वेळीच नेमकी त्याची घसरणही सुरू होते!

## बैल गेला नि झोपा केला

ग्लुस्टरशायरने १९५९ मध्ये त्याला आपला नेता नेमला व त्याच साली त्याला बेनिफिट सामना देऊन रु. ७२,००० मिळवून दिले. पण त्याच वर्षी प्रकृतीने त्याला दगा दिला व अनेक सामन्यात तो खेळूही शकला नाही. त्याच्या स्वतःच्या बेनिफिट सामन्यातही तो तेव्हा खेळू शकला नव्हता! तरीही १९६० मध्ये तोच नेता कायम ठेवला गेला. पण त्या साली कौन्टी चॅम्पियनशिपमध्ये ग्लुस्टर-

अनुक्रमणिका







शायर फार खाली घसरत गेले व नेतृत्वाच्या जबाबदारीमुळे त्याच्या फलंदाजीवर परिणाम झाला या समजुतीने नेतृत्वात बदल केला जाताच ग्रॅव्हेनी ग्लूस्टरशायर सोडून चालता झाला. पुढे दोनच वर्षांनी ग्लूस्टरशायरचे नेतृत्व टॉमचा मोठा भाऊ केनेथ ग्रॅव्हेनी याला देऊन चुकीची दुरुस्ती (!) करण्याचा प्रयत्न केला, पण तेव्हा पक्षी पिंजऱ्यातून निसटून गेलेला होता!

ग्रॅव्हेनी ग्लूस्टरशायरकडे आल्यावर, त्याच्याकडे मध्यंतरी अजिबात काणाडोळा करणाऱ्या इंग्लंडच्या निवड समितीने, त्याला पुन्हा कसोटी सामन्यात खेळण्यास बोलावले. वूस्टरशायरने १९६५-मध्ये त्याला उपनेता केले व १९६८ मध्ये नेता बनवले. त्याच सालच्या नववर्षाच्या पदवीदानात इंग्लंडच्या राणीने 'ओ. बी. ई.' हा किताबही देऊन त्याच्या खेळाचा गौरव केला. १९६८ मध्ये लीडस् येथे ऑस्ट्रेलियाविरुद्ध झालेल्या कसोटी सामन्यात ग्रॅव्हेनीने इंग्लंडचे नेतृत्वही केले! पण याचवेळी त्याचे दुर्दैव खदखदा हसत होते. १९६९ च्या क्रिकेट हंगामातच ग्रॅव्हेनीच्या शिस्तभंगाचे प्रकरण उपटले नि इंग्लंडचे क्रिकेट व टॉम ग्रॅव्हेनी यांची तेवीस वर्षांच्या सुरेख संसारानंतर कायमची फारकत झाली! १९५९ मध्ये ग्लूस्टरशायरने ग्रॅव्हेनीला 'बेनिफिट' सामना देऊन त्याचा गौरव केला तेव्हा त्या सामन्यात आजारामुळे तो स्वतः खेळू शकला नाही. त्यानंतर दहा वर्षांनी वूस्टरशायरने त्याला १९६९ मध्ये 'बेनिफिट' सामना दिला; त्यात तो एक दिवसच खेळला; पण त्यामुळेच इंग्लंडच्या संघातून त्याला कायमची गचांडी मिळाली! दैव आणि कर्म यांची ग्रॅव्हेनीच्या क्रीडाजीवनात पाठशिवणीच चाललेली दिसते!

शिस्तभंगाच्या या प्रकरणाने ग्रॅव्हेनीला दुःख झाले, पण पश्चात्ताप मात्र झाला नाही. पुन्हा अशीच परिस्थिती उद्‌भवल्यास आपण पुन्हा असेच वागू असे तो तेव्हा म्हणाला होता व आजही तीच त्याची भूमिका कायम आहे! झाल्या गोष्टीचा त्याला खेद होतो, पण खंत वाटत नाही. कारण, क्रिकेट खेळण्याइतकीच कुटुंबपोषणाचीही जबाबदारी त्याच्यावर आहे हे तो कदापि विसरू शकत नाही. इंग्लंड एका कसोटी सामन्यामागे खेळाडूला फक्त रु. २१६० देते. आणि ग्रॅव्हेनीला उपरोक्त 'शिस्तभंगी' (!) सामन्यात एकच दिवस खेळण्यासाठी रोख अठरा हजार रुपये मिळाले! पैसा त्याला स्वतःच्या चैनीसाठी नको होता, तर तो बायका-मुलांच्या पोषणासाठी जरूर होता. क्रिकेटरांची प्राप्ती मुळातच तुटपुंजी. सध्या जास्तीत जास्त प्राप्ती होणारा जगात फक्त एकच क्रिकेटर आहे– तो म्हणजे वेस्ट इंडीजचा गॅरी सोबर्स हा होय. त्याचे वार्षिक उत्पन्न पावणे तीन लाख रु. आहे. तरीही सोबर्स हा गेल्या सप्टेंबरमध्ये ऱ्होडेशियामधील 'डबल विकेट' टूर्नामेंटमध्ये खेळलाच! त्याला त्यात चार पैसे जास्त मिळाले खरे; पण त्याचेच देशबांधव या त्याच्या कृत्याबद्दल त्याच्याविरुद्ध खवळून उठले. या प्रकरणाचा अखेर निकाल कसाही झाला तरी (सोबर्सने माफी मागितल्याचे जाहीर झालेच आहे) नामवंत खेळाडू जादा मिळकतीसाठी केलेल्या प्रयत्नातून स्वतःला कसे अडचणीत पाडून घेतात याचा नमुना म्हणून सोबर्सचे उदाहरण कित्यासारखे उपयोगी पडेल! ग्रॅव्हेनी, सोबर्स, यासारखी उदाहरणे आज तुरळक दिसत असली तरी ती यापुढे वाढतच जाणार आहेत. टेनिस, फूटबॉल, यासारख्या धनदात्या खेळांमध्येही खेळाडूंचा देशत्याग अलीकडील काळात मोठ्या प्रमाणावर सुरू आहे. ऑस्ट्रेलियाच्या विश्वविख्यात रॉड लेव्हरने अमेरिकेत लग्न करून घर बांधले आहे! फूटबॉलमध्ये तर यूरोपमधील अनेक नामवंत खेळाडू दक्षिण अमेरिकेतील काही देशात मोठ्या पगारात स्थायिक झालेले आहेत. क्रिकेट हा एकच खेळ जगात असा आहे की, त्याच्या धनप्राप्तीची ठिकाणे अत्यंत मर्यादित आहेत. क्रिकेटमध्ये खेळाडूला मिळणाऱ्या पैशावर त्याचा संसार, आजच्या महागाईच्या दिवसात चालणे कठीण आहे. टॉम ग्रॅव्हेनीने तेवीस वर्षे इंग्लंडच्या क्रिकेटसाठी रक्त आटवले, पण म्हातारपणी त्याला कुटुंबासाठी देशत्याग करण्याची पाळी आलीच! स्वतःला क्रिकेटमुळे खूप आनंद मिळाला खरा पण आपली बायको व मुलगा नि मुलगी यांना फार दुःख सोसावे लागले असे ग्रॅव्हेनी म्हणतो आणि मुलांना चार सुखाचे दिवस लाभावेत याच हेतूने आपण इंग्लंड व इंग्लंडचे क्रिकेट यांना रामराम ठोकला असे त्याचे सांगणे आहे. 'क्रिकेट विरुद्ध कुटुंब' या कसोटी सामन्यात पहिल्या डावात जरी क्रिकेट वरचढ ठरले तरी अखेरीस जीत होते ती कुटुंबाची; क्रिकेटची नव्हे! क्रिकेटमुळे नाव मिळते, नोकरीही मिळते; पण क्रिकेटचा नाद सोडल्याखेरीज क्रिकेटरला कुटुंबसौख्य नि स्वास्थ्य मात्र लाभत नाही हेच टॉम ग्रॅव्हेनीच्या ताज्या उदाहरणावरून दिसून येते!

• • •

---

## शासन विरुद्ध शासकीय कर्मचारी!




एक रंगलेला सामना!



अनुक्रमणिका

—अरविंद ताटके

भारतीय क्रिकेट संघाच्या

# कप्तानपदासाठी शिलेदारांची शर्यत







**दिवाळ्यानंतर भारतीय क्रिकेट संघाचा दौरा वेस्ट इंडिजमध्ये होणार असून त्यासाठी भारतीय संघाचे नेतृत्व कुणाला द्यावे याबद्दल क्रिकेट रसिकात वाद चालू आहे. निःपक्षपातबुद्धीने अन् कुठल्याही खेळाडू-बद्दल फाजील प्रेम न दाखविता आकडेवारीनिशी केलेली या वादंगाची चिकित्सक चर्चा वाचा या लेखात !**

डर्बीच्या रेसमध्ये कुठला घोडा विजयी होईल याबद्दल रेस षौकिनात जशी आधी-पासून चर्चा सुरू होते त्याप्रमाणेच दिवाळधानंतर वेस्ट इंडिजला जाणाऱ्या भारतीय संघाचे नेतृत्व कुणाकडे सुपूर्द केले जावे याबद्दल क्रिकेट प्रेमिकात अगदी हमरीतुमरीने तर्ककुतर्क चालू आहेत. भारतीय कीर्तीच्या काही जुन्या क्रिकेट-पटूंनीही नेतृत्व कुणाला द्यावे याविषयी आपले अभिप्राय व्यक्त केले आहेत. एका नामवंत क्रिकेट समीक्षकाने याविषयी एक खास लेख लिहून कर्णधार म्हणून आपल्या प्रांतातलाच कर्णधार नेमावा असा प्रचा-राचा पांचजन्य मोठ्या हिरीरीने फुंकला आहे. हा समीक्षक चांगला जाणता असून त्याचा क्रिकेटचा व्यासंगही वाखाणण्या-सारखा आहे. तरी त्याचा प्रस्तुतचा टीका-लेख मात्र अतिशय पोरकट अन् बालिश आहे. आपल्या क्रिकेटपटूचा उदोउदो कर-ताना त्याचा सारा विवेक सुटला असून त्याच्या विवेचनाला क्रिकेट आकडेवारीचा आधार अजिबात नाही. त्याच्या टीके-बद्दल 'इट इज नॉट क्रिकेट' एवढेच म्हणता येईल.

कर्णधाराची निवड करणार आहे निवड-समिती. तिचे अध्यक्ष आहेत विजय मर्चंट. क्रिकेटचा चालता बोलता ज्ञानकोश असा त्यांचा लौकिक जगभर पसरलेला आहे. तेव्हा त्यांना सहाय्य करणाऱ्या समिती-कडून योग्य तोच कर्णधार निवडला जाईल ही गोष्ट खरी असली तरी कप्तानपदाच्या या वादाची साधार अन् चिकित्सकदृष्टचा चर्चा करणे बोधप्रद अन् मनोरंजक ठरावी.

चंदू बोर्डे, मन्सूर अली खान ऊर्फ पतौडी आणि अजित वाडेकर हे तिघे क्रिकेटपटू वादाचे भक्ष्य बनले आहेत. या तिघांपैकी एकजण भारतीय संघाचा संघनायक बनेल अशी अपेक्षा आहे. या तिघांत अनुभवाने अन् वयाने बोर्डे ज्येष्ठ आहे. तथापि कसोटी सामन्यातल्या नेतृत्वाच्या अनुभवाची पतौ-डीची शिदोरी मोठी आहे. वाडेकर जरी मुंबई संघाचा नेता असला तरी कसोटी सामन्यातल्या नेतृत्वाची संधी अजूनपर्यंत त्याला मिळालेली नाही. बोर्डेनेही कसोटी सामन्यात (ऑस्ट्रेलिया, १ ला टेस्ट सामना










१९६७–६८) एकदाच भारतीय संघाचे नेतृत्व केले आहे. पतौडीने भारतीय संघाचे नेतृत्व ३६ कसोटी सामन्यांत केलेले असून अवघ्या २१ व्या वर्षी तो भारतीय क्रिकेट संघाचा नेता बनला ही गोष्टही उल्लेखनीय म्हटली पाहिजे. गेल्या तीन टेस्ट मालिकात [न्यूझीलंड विरुद्ध न्यूझीलंडमध्ये (१९६८) न्यूझीलंड विरुद्ध भारतात (१९६९) व ऑस्ट्रेलिया विरुद्ध भारतात (१९६९–७०)] फलंदाजीत पतौडीचा प्रभाव फारसा न पडल्यामुळे त्याची आधीची सारी कामगिरी अन् कर्तृत्व डोळ्याआड करून काही आगाऊ टीकाकार त्याला कप्तानपदावरून हाकलण्यासाठी शंखध्वनी करीत आहेत. परदेशच्या दौऱ्यात पतौडी सदैव चमकलेला असतानाही त्याच्या हकालपट्टीची मागणी काही मागातून होत आहे, केवळ आपल्या प्रांतातले प्यादे पुढे ढकलण्यासाठी. पतौडीची सारी कप्तान कारकीर्द अगदी निर्दोष आहे असे कुणीच म्हणत नाही. पण एक डोळा निकामी असतानाही त्याने विलायतेत (१९६७) लीड्स कसोटी सामन्यात १४८ धावा ज्या अवघड परिस्थितीत केल्या त्यावरून कठीण परिस्थितीत कप्तानाने संघाचे तारू कसे पार करावे याची किमया पतौडीच्या मनगटात आहे ही गोष्ट एखादे शेंबडे पोरही सांगू शकेल. त्याला गचांडी द्या असे सांगणाऱ्यांना ही गोष्ट समजत नाही असे मुळीच नाही. राष्ट्रहितापेक्षा प्रांताभिमान त्यांना श्रेष्ठ वाटतो म्हणून त्यांनी पतौडीवरील टीकेचे गरळ ओकण्यास सुरुवात केली आहे. झोपलेल्या माणसाला सहज उठविता येईल. पण झोपेचे सोंग घेतलेल्यांपुढे ब्रह्मदेवालाही हात टेकावे लागतील. म्हणून 'श्वान भुकवा रे' या कबीरोक्तीप्रमाणे असल्या उथळ वोरूबहाद्दरांच्या टीकेचा विचार न करणेच बरे.

वयाने बोर्डे ३७ च्या घरात असून पतौडी व वाडेकर हे तिशीच्या घरात आहेत. तिघात लहान वाडेकर असून तो पतौडीहून तीन महिन्यांनी लहान आहे. या तिघांखेरीज बिशनचंद बेदीचे नावही कप्तानपदासाठी काही मंडळी घेत असली तरी त्यात काहीच अर्थ नाही. एकतर गोलंदाजाला संघनायक म्हणून निवडण्याची प्रथा क्वचितच दिसते अन् बेदी त्या पदासाठी अगदीच अननुभवी आहे. खरी स्पर्धा (टीकाकारांच्या मताने) आहे बोर्डे, पतौडी अन् वाडेकर या तिघातच. तेव्हा या तिघांच्या क्रिकेट पराक्रमाचा पंचनामा केल्याखेरीज या वादाचा फैसला होण्यासारखा नाही.

काही खवचट टीकाकार तर असेही बोलण्यास धजावताहेत की अहो, गेल्या वेळी न्यूझीलंड विरुद्ध ज्या बोर्डेला एकदाही टेस्ट सामन्यात खेळविले नाही अन् ऑस्ट्रेलियाविरुद्धही मुंबई टेस्टनंतर ज्या चंदू बोर्डेला निवड समितीने कायमचा अर्धचंद्र दिला ती समिती त्याला कसची संघनायक करते? ही टीका अगदीच खोटी नाही. पण क्रिकेट खेळ हा ग्लोरियस अन्सरटन्टीबद्दल ख्यातनाम असल्याने आमच्याकडे कोण केव्हा कप्तान होईल याची शाश्वती कुणीच देऊ शकत नाही. जार्डिन संघाविरुद्ध प्रथमश्रेणी सामन्यात एकच सामना जिंकल्याबद्दल १९३६ साली विझींना नव्हता का बहाल केला कप्तानपदाचा मुकुट? भारतीय क्रिकेटचा साराच मामला अतर्क्य. तेव्हा वरील खवचट टीकाकारांकडे आपण कानाडोळा करूया. ऑस्ट्रेलियाविरुद्ध पुण्यात प्रथमश्रेणी सामन्यात बोर्डेने शतक केल्यावर त्याला मुंबईच्या टेस्टमध्ये घेण्यात आले. तिथे दोन्ही डावात तो अपयशाचा धनी झाल्यामुळे उरलेल्या चार टेस्ट सामन्यात निवडसमितीने बोर्डेला डावलले ही तिची चूक झाली असे मला अजूनही वाटते. पण एक गोष्टही मुलाहिजा न ठेवता सांगितली पाहिजे ती ही की बोर्डेने पूर्वी जरी क्रिकेटमैदान गाजविले असले तरी अलीकडे त्याच्या खेळाला उतरती कळा तर लागली आहेच अन् परदेशात कसोटी सामन्यात त्याचा खेळ सदैव पडखाऊच झालेला आहे. जाता जाता आणखी एक गोष्ट वाचकांच्या नजरेस आणावीशी वाटते की, विलायतेच्या दोन्ही दौऱ्यात (१९५९ व १९६७) कसोटी सामन्यात बोर्डेची फलंदाजी पुरी फजित पावलेली आहे. ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यातही (१९६७–६८) टेस्टमध्ये त्याचे तेज अजिबात पडले नाही. इंग्लंड-ऑस्ट्रेलियातले टेस्ट सामने टेस्ट क्रिकेटपटूंचे मानदंड असतात ही गोष्ट नव्याने सांगण्याची गरज नाही. अन् या दोन्ही देशातच टेस्टमध्ये बोर्डेच्या फलंदाजीची भंबेरी उडालेली आहे. त्याची आकडेवारी पुढे देणारच आहे. याउलट १९६७ मध्ये पतौडीने इंग्लंडात लीड्स टेस्टमध्ये बाजी मारून शतक फडकविले अन् त्या पराक्रमाप्रीत्यर्थ 'विस्डेन्' वार्षिकाने १९६८ च्या क्रिकेटपटूंच्या आपल्या पंचायतनात त्याचा समावेशही केला. हा मान १९४७ साली मनकडने मिळविला व नंतर २० वर्षांनी त्याची पुनरावृत्ती पतौडीने केली. इंग्लंडचे एक जाऊदे. पण ऑस्ट्रेलियातही बोर्डे निष्प्रभ का ठरावा? तिकडे पतौडीने तर त्याच्यावर मात केलीच. पण वाडेकरनेही बोर्डेपेक्षा जास्त पराक्रम ऑस्ट्रेलियात नोंदविला आहे. या गोष्टी बोर्डेचे लघुत्व सांगण्यासाठी मी सांगत नसून सत्यतेचे चित्रच मी वाचकांपुढे ठेवतोय. या अशा गोष्टींमुळे निवड समितीचा बोर्डेवरील विश्वास उडाला असावा असे दिसते. बोर्डे–पतौडीच्या टेस्ट सामन्यातल्या आकडेवारीची तुलना पुढे करणारच आहे. सध्या फक्त दोघातला ठळक फरक सांगितला. वादाच्या स्पर्धेतला तिसरा वीर अजित वाडेकर. हा धडाकेबाज फलंदाज आहे खरा. तिसऱ्या–चौथ्या अनुक्रमावर हा खेळण्यास जातो. पण याच्या फलंदाजीत सातत्याचा अभाव सतत दिसत आला आहे. पुष्कळदा नशीबही त्याला झुकांडी देते. एरवी इंग्लंडात (९१) अन् ऑस्ट्रेलियांत (९९) त्याची शतके चुकती ना. एवढेच कशाला १९६९–७० साली ऑस्ट्रेलियाविरुद्ध इकडे एका सामन्यात ९१ धावावर तो नाबाद राहिला अन् पुन्हा त्याचे शतक चुकले. या तिघांच्या काम-












गिरीचे नुकते नमन करून ठेवतोय. आकडेवारीत त्यांच्या कर्तृत्वाचे नाटच दिसेल अन् नेतृत्वाची धुरा खंबीरपणे कोण पेलेल त्याचाही प्रत्यय येईल.

बोर्डेचा टेस्ट क्रिकेटमध्ये प्रवेश २४ व्या वर्षी १९५८–५९ साली वेस्ट इंडिज विरुद्ध प्रथम झाला. त्यावेळी ४ कसोटी सामन्यात ७ डावात त्याने २८१ धावा केल्या. दिल्लीला दोन्ही डावात शतके करण्याची संधी त्याला आली होती. पहिल्या डावात त्याने १०९ धावा केल्या तर दुसऱ्या डावात नशीब मांजरासारखे त्याच्या आड आले. ९६ धावा झाल्यावर 'हिट विकेट' होऊन तो बाद झाला. तेव्हापासून कसोटी सामन्यातली त्याची जागा पक्की झाली. १९५९ साली तो विलायतेच्या दौऱ्यावर गेला. तिथे कसोटी सामन्यात ७ डावात त्याने फक्त १४० धावा केल्या. इंग्लंडात त्याचा प्रभाव फारसा पडला नाही. पुढील वर्षी १९५९–६० साली ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध तो फारसा चमकला नाही. ५ टेस्टमध्ये १० डावात त्याच्या फक्त १६५ धावा झाल्या. १९६०–६१ मध्ये इकडे आलेल्या पाक संघाविरुद्ध ६ डावात ३३० धावा काढून त्याने एक शतकही काढले. त्यानंतर दोनदा एम्. सी. सी. संघ (१९६१–६२ व १९६३–६४) इकडे येऊन गेला तेव्हा बोर्डे चमकत असला तरी टेस्टमध्ये त्याचे शकत लागलेले दिसत नाही. १९६२ मध्ये तो वेस्ट इंडिजमध्ये थोडाबहुत चमकला तरी त्यावेळचा आमचा खरा वीर होता पॉली उम्रीगर. त्याच्या मानाने बोर्डे निष्प्रभच वाटला. १९६४ साली ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध इकडे तो पुन्हा चकमला. पुढील वर्षी इकडे आलेल्या न्यूझीलंड संघाविरुद्ध कसोटी सामन्यात त्याने शतक काढले व १९६६–६७ साली इकडे आलेल्या विंडीज विरुद्ध त्याने दोन शतके टेस्टमध्ये काढली. त्यानंतर इंग्लंड-ऑस्ट्रेलियन दौऱ्यात टेस्टमध्ये तो साफ कोसळलेला आहे. १९६८ च्या न्यूझीलंड दौऱ्यात टेस्टमध्ये तो एकंदरीत वरा खेळला. त्यानंतर इकडे आलेल्या (१९६९) न्यूझीलंड संघाविरुद्ध त्याची निवड टेस्टमध्ये झाली नाही. १९६९–७०-च्या ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध मुंबईला टेस्ट सामन्यात त्याची निवड झाली. पण दोन्ही डावात त्याचा खेळ घसरला. आतापर्यंत बोर्डे ५५ कसोटी सामने खेळला असून त्याच्या धावा ३०६४ झाल्या आहेत. त्याने ५ शतके काढली आहेत. ३ विंडीज विरुद्ध व प्रत्येकी एक पाकिस्तान विरुद्ध व न्यूझीलंड विरुद्ध. त्याच्या फलंदाजीची सरासरी ३५.६२ अशी आहे. इंग्लंडच्या दोन्ही सफरीत (१९५९–१९६७) कसोटी सामन्यात तो साफ अयशस्वी झाला व ऑस्ट्रेलियातही (१९६७–६८) टेस्टमध्ये त्याची बॅटिंग पडखाऊ झाली. इंग्लंड ऑस्ट्रेलिया विरुद्ध कसोटी सामन्यात त्याला कधीही शतक काढता आलेले नाही. विशेषतः विलायतेच्या दोन्ही दौऱ्यात हा आमचा खंदा फलंदाज टेस्टमध्ये इतका निष्प्रभ का पडावा त्याचे कोडे सुटत नाही. १९६५ सालपर्यंत तो गोलंदाजीही टाकीत असे अन् अष्टपैलू खेळाडू असा त्याचा लौकिक होता. टेस्टमध्ये त्याचा प्रवेश अष्टपैलू क्रिकेटियर म्हणून झाला तर पतौडीचा प्रवेश केवळ उत्तम फलंदाज म्हणून झाला. हा दोघांमधला फरक लक्षात ठेवण्यासारखा आहे.

मन्सूर अली भारतात एम्. सी. सी. विरुद्ध टेस्टमध्ये १९६१–६२ मध्ये खेळला. पहिल्या दोन कसोटी सामन्यात त्याचे फारसे तेज पडले नसले तरी मद्रासच्या शेवटच्या टेस्ट सामन्यात त्याने शतक (१०३) काढलेच. पहिल्याच मालिकेत ३ टेस्टमध्ये ५ डावात त्याने २२२ धावा केल्या. त्याची सरासरी भरली ४४.४०. या पहिल्या टेस्ट शतकात त्याने १६ चौकार व २ षटकार मारले होते. अत्यंत चमकदार असे ते शतक होते. त्यापूर्वी मोटार अपघातात त्याचा उजवा डोळा निकामी होऊन त्या डोळ्यावर दोनदा शस्त्रक्रियाही झाल्या होत्या. तरीही हा डगमगला नाही व झंझावाती खेळ करून त्याने मद्रासला शतक ठोकले. १९६२ च्या वेस्ट इंडिज दौऱ्यात कॉंट्रॅक्टरला दुखापत झाल्यावर त्याला कप्तानपद देण्यात आले. आतापर्यंत ३६ कसोटी सामन्यात भारताचे नेतृत्व त्याने केले असून सात वेळा त्याने संघाला विजय मिळवून दिला आहे. आतापर्यंत तो ३९ टेस्ट सामने खेळला असून त्याने ६ शतके काढली आहेत. इंग्लंड विरुद्ध ३, ऑस्ट्रेलिया विरुद्ध १, न्यूझीलंडविरुद्ध २ अशी शतके त्याने काढली आहेत. त्याच्या टेस्टमधील धावा २५५२ असून त्याच्या बॅटिंगचे सरासरी प्रमाण ३६.९९ असे आहे. क्षेत्ररक्षक म्हणून भारतात तरी त्याला तोड नाही. कव्हरपॉइंटचे क्षेत्ररक्षण तो वाघाच्या चपळाईने करतो. परदेशात बोर्डेपेक्षा तो नेहमीच यशस्वी फलंदाज ठरलेला आहे ही गोष्ट नाकारता येणार नाही. गेल्या तीन मालिकेत, (न्यूझीलंड विरुद्ध २ वेळा व ऑस्ट्रेलिया विरुद्ध एका मालिकेत १९६८, १९६९ व १९६९–७०) तो फलंदाजीत अयशस्वी झाला आहे खरा. पण बोर्डेने तरी या अवधीत फलंदाजीच्या पराक्रमाचा फड मारला आहे असे म्हणता येणार नाही. विशेषतः इंग्लंड, ऑस्ट्रेलियात बोर्डेची फलंदाजी साफ कोसळली तर पतौडी तिकडे चांगलाच गाजलाय. लहरीपणा, खेळाडूंना एकत्र बोलावून न घेणे, योग्य त्या गोलंदाजाकडे दुर्लक्ष करणे वगैरे दुर्गुण त्याच्यात आहेतच. पण साहस, वेडरपणा, आणीबाणीच्या परिस्थितीत पाय रोवून खेळण्याची झुंजार वृत्ती यात तो सध्या तरी बोर्डेहून सरस वाटतो. हेच गुण पूर्वी बोर्डेत होते पण आता तरी ते लुप्त झाल्यासारखे वाटतात. एरवी इंग्लंड ऑस्ट्रेलियात त्याच्या फलंदाजीचे पानिपत होते ना. एवढेच कशाला आमचा वाडेकरही इंग्लंड ऑस्ट्रेलियात बोर्डेपेक्षा फलंदाजीत जास्त यशस्वी ठरलेला आहे. बोर्डेला कप्तानपद एकदाच मिळालेय. पतौडी ३६ वेळा कप्तान झाला आहे. स्वभावाचा भाग वगळता, फलंदाजी व कप्तानपदात तो बोर्डेहूनही सरस वाटतो. बोर्डे जर इतक्या वेळा कप्तान झाला असता तर त्याच्यावरही टीका झालीच असती. आमचा लाला

अमरनाथ काय कप्तान म्हणून वाईट होता? पण त्याच्यावरही दुलीपसिंगसारख्यांनी अगदी कडक टीका केलीच होती की. पतौडीहून जास्त लायक संघनायक दुसरा कुणी दिसत नसल्याने त्याच्याकडेच नेतृत्व सोपवावे असे मला वाटते. विनू मनकड, मांजरेकर, मोदी, नरी काँट्रॅक्टर या जुन्या क्रिकेटपटूंचा कौलही पतौडीच्याच बाजूचा आहे.

वाडेकर आतापर्यंत २१ टेस्ट खेळला आहे. फक्त न्यूझीलंड विरुद्धच त्याचे शतक लागलेले दिसते. त्याच्या सर्व धावा १३६६ असून त्याच्या बॅटिंगचे सरासरी प्रमाण ३४.१५ आहे. नशिबाचे फासे त्याला अनुकूल पडते तर इंग्लंड ऑस्ट्रेलियात व भारतातही ऑस्ट्रेलियाविरुद्ध शतके लावण्याची संधी त्याला मिळाली असती. इंग्लंडात ९१ वर, ऑस्ट्रेलियात ९९ वर व भारतात ऑस्ट्रेलिया विरुद्ध तो ९१ वर नाबाद राहिलेला आहे. त्याची फलंदाजी नेत्रदीपक आहे व मुंबई संघाचा तो कर्णधार आहे. तेव्हा भावी काळाकडे नजर ठेवून त्याला उपकप्तान म्हणूनच वेस्ट इंडिजच्या दौऱ्यावर पाठवावे.

बोर्डेला दौऱ्यावर नेऊच नये असेही कित्येकजण म्हणतात. पण ती टीका पूर्वग्रहाची म्हणून सोडून देऊ. बोर्डेला जरूर न्यावे दौऱ्यावर. अनुभवी व भक्कम फलंदाज म्हणून संघाला त्याचा उपयोग अतिशय होईल. पण कप्तान म्हणून त्याला नेणे बरोबर वाटत नाही. या संधीचा फायदा बोर्डेने उत्तम प्रकारे उठवावा व पॉली उम्रीगरप्रमाणे विंडीजमध्ये फलंदाजीचा पराक्रम असा करावा की त्यानंतरच्या इंग्लंड दौऱ्यावरही त्याला पाठविणे निवड समितीला भाग पडावे. बोर्डे, पतौडी व वाडेकर या आमच्या तीन शिलेदारांच्या चुरशीबद्दल माझा अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे १) पतौडीच संघनायक असावा, (२) वाडेकरला उप-कप्तान करावे (३) बोर्डेचा समावेश संघात अवश्य करावा.

सध्या तरी पतौडी व वाडेकर यांचा संघात समावेश निश्चित आहे. बोर्डेला तिही शाश्वती नाही. बोर्डेवर अन्याय होऊ नये. पुन्हा विंडीजला जाण्याची संधी त्याला अवश्य मिळावी. विश् यू बेस्ट ऑफ लक बोर्डे!! ● ● ●



# विक्रम, उच्चांक आणि (तरी सुद्धा) अपयश

मनुष्याला किती जागा लागते याविषयी टॉल्स्टॉयची एक मोठी मार्मिक गोष्ट आहे. केवळ पळून जेवढी जागा तो काटेल तेवढी जागा त्या माणसाची होणार होती. अट एवढीच होती की, निघालेल्या जागेपर्यंत त्याने सूर्यास्तापूर्वी परत आले पाहिजे. त्या माणसाने पळून शेकडो एकर अंतर काटले, पण सूर्यास्तापूर्वी तो पूर्वस्थळी पोहोचू शकला नाही आणि अतिश्रमाने प्राणास मुकला. शेवटी फक्त साडेतीन हात जागा त्याला पुरेशी ठरली. असाच काहीसा प्रकार क्रिकेटमध्ये संभवतो. विजयासाठी संघाला किती धावा लागतात? अनेक विक्रम व उच्चांक मोडले असता यशप्राप्ती होते काय? धावांचे डोंगर रचून विजयशिखर गाठता येते काय? अखेर असे आढळून येते की, या सर्व गोष्टींपेक्षा प्रतिपक्षाहून फक्त एकच धाव अधिक करणे हाच जय-पराजयामधील फरक आहे.

विश्वास ठेवणे कठीण आहे. पण धावांच्या विक्रमानंतरही संघाला अपयश आल्याची उदाहरणे आहेत. ६०० च्या वर धावा करणे म्हणजे धावांचा डोंगर रचणे असे म्हणतात. वस्तुतः एवढ्या धावा काढल्यावर संघाला सरशी मिळण्यास हरकत नसावी. परंतु १२ वेळा रणजी करंडक जिंकणाऱ्या मुंबई संघाला असा अनुभव आला की, हा आकडा प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यास पुरेसा नाही.

या संघाने महाराष्ट्राविरुद्ध ६५० धावा केल्या (१९४०–४१) त्यावेळी ही धावसंख्या भारतीय क्रिकेटमध्ये क्रमांक २ ची होती. पण मुंबईच्या दुर्दैवाने याच सामन्यात महाराष्ट्राने ६७५ धावांची मजल मारल्यामुळे—त्यावेळचा भारतीय उच्चांक—मुंबईला हार पत्करावी लागली.

१९४५–४६ मध्ये मुंबईने बडोद्याविरुद्ध ६०९ धावा ठोकल्या. यात चार वैयक्तिक शतकेही होती; पण ठराविक वेळात विरुद्ध बाजूला बाद न केल्यामुळे सामन्याचा निकाल नाणेफेकीने करण्यात आला व कौल मुंबईच्या विरुद्ध गेला.

१९३८–३९ साली पाचव्या कसोटी सामन्यात दक्षिण आफ्रिकेविरुद्ध इंग्लंडने तर दुसऱ्या डावात जागतिक विक्रम केला. या संघाने ५ बाद ६५४ धावा केल्या. दुसऱ्या डावात अजूनपर्यंत कोणत्याही संघाने एवढ्या धावा काढल्या नाहीत. या सामन्याचे वैशिष्ट्य असे की तो १० दिवस खेळला गेला. प्रथम असे ठरले होते की सामना पूर्ण होईपर्यंत खेळावयाचा. मग कितीही दिवस लागले तरी चालेल. पण १० दिवसानंतरही निर्णय न लागल्याने इंग्लिश संघाला परतीची बोट पकडण्याची असल्यामुळे सामना जिंकण्यास इंग्लिश संघाला फक्त ४२ धावांची जरूरी असताना अर्धवट सोडून परतावे लागले. काय उपयोग विक्रमाचा?




क्रिकेट क्षितिजावरील उगवता तारा....

# बॅरी रिचर्डस

—बाळ ज. पंडित

बॅरी रिचर्डस् हे नाव भारतात अपरिचित असले तरी ते इंग्लिश क्रिकेटमध्ये सर्वांच्या परिचयाचे आहे. आता ते ऑस्ट्रेलियात सर्वतो-मुखी होत आहे. दक्षिण आफ्रिकेत तर ह्या नावाला आज मोठी किंमत आहे. थोडयाच अवधीत हे नाव जगात सुपरिचित होणार आहे, दुमदुमणार आहे.

बॅरी रिचर्डस् हा द. आफ्रिकेचा खेळाडू. परंतु तो धंदेवाईक खेळाडू म्हणून खेळतो इंग्लंडमध्ये. आणि आता यंदापासून तो ऑस्ट्रेलियातही व्यावसायिक खेळाडू म्हणून खेळू लागला आहे. एका तिसऱ्याच देशाचा खेळाडू इतर दोन देशात पहिल्या दर्जाचे क्रिकेट खेळण्यास जातो आणि तिथे मान मिळवतो याला फार मोठा अर्थ आहे. अशी उदाहरणे क्रिकेटमध्ये दुर्मिळ आहेत. सोवर्स व कन्हाईला अशी दोन देशात मागणी होती. पण बॅरी रिचर्डस् हा एकाच क्रिकेट हंगामात दोन देशांकडून खेळतो आहे !

त्याने ऑस्ट्रेलियात पहिल्याच सामन्यामध्ये आपला दरारा पटवला. इंग्लंडच्या स्नो, लाव्हर, इलिंगवर्थ, डॉलीव्हीएरा व विल्सन् या गोलंदाजांविरुद्ध सलामीच्या सामन्यातच २२४ धावा ठोकल्या. वूडकॉकबरोबर १ ल्या जोडीसाठी ३५ ची भागीदारी केली, इआन् चॅपेलबरोबर दुसऱ्या जोडीसाठी २३५ ची भागिदारी केली ( फक्त १६९ मिनिटात ) आणि नंतर ग्रेग चॅपेलबरोबर तिसऱ्या जोडीसाठी १४८ ची भागीदारी केली (मिनिटाला एक धावेचे प्रमाण राखून) रिचर्डस्ने स्वतःच्या १५० धावा करण्यास २४५ मिनिटे घेतली व २०० धावा पूर्ण करण्यास एकूण ३१२ मिनिटे घेतली. आपल्या २२४ धावात त्याने २१ चौकार व १ जंगी षट्कार मारला ! रिचर्डस् बाद होऊन परतला तेव्हा उप-स्थितांनी उभे राहून त्याचे वीरोचित् स्वागत केले ! – मला वाटते त्याचे असेच स्वागत यापुढे ठिकठिकाणी होणार !

इंग्लिश क्रिकेट आज परकीय खेळाडूंच्या जीवावर जगत आहे. बाटलीच्या दुधावर पोसल्या जाणाऱ्या ह्या क्रिकेटविश्वात बॅरी रिच-र्डस्ने अगदी थोडक्या अवकाशात आपले एक स्वतंत्र स्थान निर्माण केले आहे.

**आज इंग्लिश क्रिकेटला गर्दीची आवश्यकता आहे. टर्नस्टाईल्स-मध्ये पडणाऱ्या नाण्यांची जरूरी आहे. ही कामगिरी गॅरी सोबर्स चोख बजावतो. त्याच्या खालोखाल आता याबाबतीत बॅरी रिचर्डस्-चेच नाव घेतले पाहिजे. पूर्वी कन्हाईला होते तसे महत्त्व आता बॅरी रिचर्डस्च्या नावाला आलेले आहे. या नावात गर्दीला खेचून घेण्याची जादू भरलेली आहे आणि त्या जादूत गर्दीचं मन मोहरून टाकण्याची शक्ती आहे. रिचर्डस्ला पाहण्यासाठी आलेले लोक त्याचा खेळ बघून जागेवर स्थिरावतात आणि त्याच्या फटक्यातील किमया बघून कायमचे खूष होतात. रिचर्डस् हा परदेशी खेळाडू असला तरी तो आज इंग्रजांना इंग्लिश खेळाडूपेक्षाही जास्त आवडतो. त्याचीच भुरळ आज इंग्रजांना जास्त आहे. तीच परिस्थिती आता कदाचित् ऑस्ट्रेलियातही निर्माण होणार आहे !** आपणच भारतीय क्रिकेट-रसिक कमनशिबी की त्याचा खेळ पाहू शकणार नाही !

बॅरी हा द. आफ्रिकेचा. नाताळ प्रांतातील दरबान या गावी त्याचा जन्म झालेला आहे. जन्म तारीख आहे २१ जुलै १९४५. त्याचे लालनपोषण मातृभूमीने केले. तिच्या मांडीवर खेळूनच तो लहानाचा मोठा होत गेला; पण आता त्याचा खेळ ब्रिटिश व ऑस्ट्रे-लियन् नर्संच्या घरी वाढतो आहे. ह्या दोघी नर्सच त्याचे संगोपन व संवर्धन चांगल्या प्रकारे करताहेत. वेळ आली की हा बॅरी आपल्या मातृभूमीच्या मदतीला धावून जातो. तिची सेवाचाकरी करतो. यंदाच ऑस्ट्रेलियाची चाल आली असताना बॅरी रिचर्डस् दक्षिण आफ्रिकेत गेला आणि स्वदेशाकडून खेळला. नुसताच खेळला नव्हे

तर चांगल्या रीतीने खेळला.

अशा रीतीने बॅरीचा पिंड दक्षिण आफ्रिकेने बनवला आहे. पण शिल्प इंग्लंडने घडविले आहे.

**आणि हा बॅरी आज दोन्ही राष्ट्रांच्या उपयोगी पडत आहे. इंग्लिश कौंटी क्लबच्या खजिन्यात पैसा ओतता ओतताच तेथील क्रिकेट लोकप्रिय करतो आहे व स्वदेशाकडून टेस्ट खेळून ऑस्ट्रेलिया-सारख्या मातब्बर प्रतिस्पर्ध्याला रोखतो आहे. स्वदेशाची शक्ती वाढवून क्रिकेटक्षेत्रातील दक्षिण आफ्रिकेच्या नावाला यशाचा व शक्तीचा मुलामा चढवीत आहे.**

दरबानच्या हायस्कूलमध्ये शिकत असताना रिचर्डस्‌ला लेस्ली थिओवाल्डचे, वटलरचे व विल्फ आयझेक्सचे मौलिक मार्गदर्शन लाभले. या तिघांचा नामोल्लेख तो अजूनही कृतज्ञतेच्या भावनेने करतो.

थिओवाल्डला सापडलेल्या या हिऱ्याला पैलू पाडले वर उल्लेखिलेल्या आयझेक्स नामक एक क्रिकेट-प्रेमी रसिकाने. या आयझेक्सने अनेक दक्षिण आफ्रिकन खेळाडूंना प्रेरणा व स्फूर्ति दिली आहे. त्यातूनच रिचर्डस्‌मधला क्रिकेटर उठून उभा राहिला.

१९६३ साली रिचर्डस्‌ला अखिल दक्षिण आफ्रिकन शालेय संघाचे कप्तान करण्यात आले आणि त्याच्या नेतृत्वाखालीच त्या संयुक्त शालेय संघाचा दौरा इंग्लंडमध्ये गेला. सुदैवाची गोष्ट अशी की दरबान हायस्कूलचे क्रिकेटशिक्षक लेस्ली थिओवाल्ड हेच यावेळी दौऱ्याचे मॅनेजर होते. इथे गुरुपासून शिष्याला बरेच शिकायला मिळाले ! या गुरुशिष्याच्या युतीतूनच संघाला भरघोस यश लाभले ! दौऱ्यात आजचा टेस्टवीर माईक प्रॉक्टर व हिल्टन ॲकरमन् हे दोन होतकरू शालेय खेळाडू होते. पण या सगळचात रिचर्डस्‌नेच जास्त धावा केल्या –– ७९८ धावा–१८ डावात – आणि सरासरी गाठली (सुमारे) ५० धावांची ! ईटनविरुद्ध त्याने ११० मिनिटात केलेल्या १०६ धावा जितक्या तडफदार होत्या तितक्याच आकर्षकही होत्या. हॅंपशायर शाळेविरुद्ध त्याने केवळ ७६ मिनिटात ७९ धावा तडकावल्या होत्या !

हे तडकावणे, ही तडफ, ही आकर्षकता––हेच रिचर्डस्‌च्या फलंदाजीचे प्रथमपासूनचे वैशिष्टच होते.

क्लिफ्टन प्रीपरेटरी स्कूल, दरबान हायस्कूल, नाताळ स्कूल आणि दक्षिण आफ्रिकेचा संयुक्त शालेय संघ अशा पायऱ्या तो चढला अगदी झपाटचाने. त्याच्या फलंदाजीचाच वेग या प्रगतीत आला होता! १९६२–६३ व १९६३–६४ साली तो संयुक्त शालेय संघाकडून खेळला. त्यानंतर नाताळ टेक्निकल कॉलेजकडून तो खेळला आणि १९६४–६५ च्या हंगामातच तो नाताळच्या प्रथमश्रेणी संघात जाऊन बसला आणि "करी–कप" सामन्यात उतरला ! प्रत्येक क्लबातून व संघाकडून खेळताना त्याने आपल्या तडाखेबंद फटकेबाजीच्या जोरावर हजारो प्रेक्षकांना आपलेसे केले.

**.... अवघं पंचवीस वर्षांचं वय .... पण पराक्रम मात्र गगनाला गवसणी घालणारा....या तरुण खेळाडूचा झंझावाती खेळ पाहण्यास मिळालेले क्रिकेट शौकिन खरोखरीच धन्यधन्य होत....**

## चेंडूपेक्षा बॅटवर लक्ष केंद्रित

१९६५ साली आपला सहकारी माईक प्रॉक्टरबरोबर रिचर्ड्स इंग्लंडला गेला आणि तेथे तो ग्लॉस्टरशायरच्या दुय्यम संघाकडून खेळला. तेथे त्याने ६३२ धावा केल्या. (सरासरी ३०.०९ धावा). हाच अनुभव आज त्याला उपयोगी पडत आहे. त्यावेळी रिचर्ड्स गोलंदाजीही करीत असे. .आपल्या ऑफब्रेक्सवर त्याने २९ विकेट्स त्या हंगामात घेतल्या होत्या. हल्ली मात्र तो गोलंदाजीसाठी आपला हात क्वचितच फिरवतो. सध्या त्याने लक्ष केंद्रित केले आहे ते हातातील बॅट फिरवण्यावर ! नाही म्हणायला गेल्याच वर्षी (म्हणजे १९६९ साली) त्याने हॅंपशायरकडून खेळताना १२ विकेटस् घेतल्या होत्या. त्यापैकी ७ विकेट्स तर त्याने शेष जागतिक संघाविरुद्धच घेतल्या होत्या ! पण हे सठीसामासी मिळालेले यश. .गोलंदाज म्हणून तो आज प्रसिद्ध नाही व त्या कामात त्याला समाधानही नाही !

ग्लॉस्टरकडून बॅरी दुय्यम संघात खेळला. पण एवढचावर त्याची महत्वाकांक्षा तृप्त होणारी नव्हती. तिला वर वर जायचे होते. एवढचात एक संधी चालून आली. स्वदेशच्या संघाविरुद्धच खेळण्याची बॅरीवर पाळी आली. १९६५ सालीच दक्षिण आफ्रिकेचा संघ फॅन डर मार्वच्या नेतृत्वाखाली इंग्लंडमध्ये कसोटी सामने खेळण्यासाठी आला होता. त्यावेळी रीचर्ड्सला ग्लॉस्टरच्या ज्येष्ठ संघाकडून खेळण्याची संधी मिळाली. तो खेळला आणि त्याने ५९ धावा केल्या. प्रॉक्टरबरोबर त्याने ११६ धावांची भागीदारीही केली. रिचर्डस्‌च्या या खेळामुळे ग्लॉस्टर संघाला तर आनंद झालाच पण फॅन डर मार्वच्या दक्षिण आफ्रिकन संघालाही आनंद झाला. आपलाच एक चांगला खेळाडू त्यांना दुसऱ्या देशात सापडला होता !

ग्लॉस्टर संघाला वाटले होते की रिचर्डस् आता आपल्याकडून खेळेल. पण पुढल्याच वर्षी प्रॉक्टर व रिचर्डस् दोघेही मायदेशी परतले. त्यामुळे ग्लॉस्टरशायरची घोर निराशा झाली. त्यानंतरच्या वर्षी रिचर्डस् इंग्लंडमध्ये पुन्हा परतला पण ग्लॉस्टरकडून खेळण्यासाठी नव्हे तर हॅंपशायरकडून खेळण्यासाठी. ससेक्सकडूनही त्याला 'मागणी' होती ! पण त्याने हॅंपशायरचीच पसंती केली.

**१९६६ साली रिचर्ड्स जेव्हा मायदेशी आला होता तेव्हा तो ईस्ट लंडन येथे (दक्षिण आफ्रिकेतील एक गाव) ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध खेळला होता आणि त्याने पाहुण्याविरुद्ध एक शतकही ठोकले होते. आता तो टेस्टमध्ये निवडला जाणार अशी सर्वांची अपेक्षा होती. पण रिचर्डस्‌ची, का कुणास ठाऊक, वर्णी लागलीच नाही. १९६८ साली इंग्लंडचा दक्षिण आफ्रिकेतील दौरा रद्द झाला. त्यामुळेही रिचर्डस्‌ला पुन्हा संधी हुकली! हा लपंडाव किती वर्षे चालला असता कोण जाणे! पण शेवटी १९७० मध्ये रिचर्डस्‌ला**








टेस्टचा दरवाजा खुला झाला. बॉबी सिंपसनच्या ऑस्ट्रेलियन संघाविरुद्ध १९६८ सालीच ज्या रिचर्डूसने टेस्टमधले आपले पहिले पदार्पण साजरे केले असते त्याला दोन वर्षे थांबावे लागले आणि अखेर लॉरीच्या ऑस्ट्रेलियन संघाविरुद्धच त्याने टेस्टची संधी मिळवली !

रिचर्डस् हा उंचापुरा आणि कमावलेल्या शरीरप्रकृतीचा खेळाडू आहे. बारीक बारीक डोळे, भुरे भुरे केस आणि किंचित पुढे आलेले दात . . .असा हा रिचर्डस् स्वतःच्या प्रयत्नावर आणि थोरामोठ्यांच्या मार्गदर्शनावर पुढे आलेला आहे. दक्षिण आफ्रिकेत साऱ्याच गौरकाय खेळाडूंना प्राधान्य मिळते, उत्तेजन मिळते. तसे रिचर्डस्‌लाही मिळाले. त्याच्याजवळ अंगभूत कला होतीच, तिला इतरांच्या प्रोत्साहनाचा स्पर्श होताच ती फुलली ! बहरत गेली ! कलावेल बहरली तरी तिला खतपाणी घालावेच लागते. क्रिकेटमधले कौशल्य वाढवायचे म्हणजे मेहनत करावीच लागते. यासाठी खेळाडूजवळ निष्ठा हवी, एकाग्रता हवी, ज़िद्द हवी, ध्येयवृद्धी हवी. या गोष्टी शिकवून येत नाहीत. त्या खेळाडूत उपजतच असाव्या लागतात. सर्व मोठ्या खेळाडूंचा प्रवास या वाटेनेच झाला आहे. याच पायऱ्यांवर चढून त्यांनी कीर्तीचे शिखर गाठलेले आहे. सुदैवाने हे सर्वच गुण रिचर्डस्‌-जवळ आहेत. अगदी स्वयंभू आहेत. त्यामुळे तोही कीर्ती-शिखर गाठेल याविषयी शंका नको.

रिचर्डस्‌ने फलंदाजीत कुणाच्याही शैलीचे अनुकरण केलेले नाही. मात्र त्याच्या खेळावर लेन हटनची दाट छाया पसरलेली दिसते. "लेन हटनच्या खेळाने माझ्या मनावर फार मोठा पगडा बसवला" हे रिचर्डस् कबूल करतो. "मी जेव्हा दरबानच्या शाळेत शिकत होतो तेव्हा लेन हटनच्या शास्त्रीय फटक्यांची चित्रे मी अभ्यासत असे. त्याचा कदाचित् माझ्या खेळावर कळत नकळत परिणाम झालेला असावा. हटनचे तंत्र निर्दोष होते असे माझे मत आहे. इतका तंत्रशुद्ध फलंदाज मी पूर्वी कधीच पाहिला नव्हता !"––रिचर्डस् सांगतो.

रिचर्डस्‌चा पवित्रा व खेळ कसा दिसतो ? तो पवित्रा घेऊन उभा राहातो, तोच मुळी शांत, धीरगंभीरपणे. तिथे दिसतो आत्मविश्वास. त्यात भित्रेपणा नसतो की थिल्लरपणाही नसतो. त्याची बॅट आणि पाय हलू लागले की ही यांत्रिक हालचाल नसून तांत्रिक हालचाल आहे हे समजते. ३०।३५ कसोटी सामने खेळलेल्या मुरब्बी माणसाचे तंत्र त्याच्या फलंदाजीतून प्रतीत होते, तेव्हा तर अचंबा वाटतो ! एवढ्या तरण्या खेळाडूकडे एवढे अनुभवाने शहाणे झालेले अचूक तंत्र कोठून आले असेही मनात येऊन जाते. आणि हे निर्दोष तंत्र पाहूनच टीकाकार आणि रसिक रिचर्डस्‌वर फिदा होतात. त्याच्या ऑफड्राईव्हज्‌ची व कव्हरड्राईव्हज्‌ची तुलना ते वॉल्टर, हॅमंड व लेन हटनबरोबर करतात. हॅमंड आणि हटन हे एकेकाळी इंग्लीश प्रेक्षकांचे अत्यंत आवडते खेळाडू होते. क्रिकेटमधील दैवतेच म्हणा ना ! या दोन्ही दैवतांचे दर्शन त्यांना रिचर्डस्‌च्या खेळातून घडते ! आणि म्हणून त्यांना रिचर्डस् आवडतो, त्याचे फटके आवडतात, त्याची सारी फलंदाजीच आवडते !

रिचर्डस् रंगात आल्यावर खेळतो कसा ह्याचे दृश्य ज्यांनी त्याचा नॉटींगहॅमविरुद्धचा सामना पाहिला होता त्यांना दिसले. त्यावेळी त्याने २०६ धावा केल्या होत्या. रिचर्डस्‌चा तो खेळ पाहून ईगर नावाचा एक जुना, अनुभवी खेळाडू म्हणाला, "हॅमंडनंतर असे ड्राईव्हज् कोणाकडूनच बघायला मिळाले नव्हते बुवा !" ईगरचे बोल खोटे नव्हते. हाफ्-व्हॉली पडली रे पडली की पाय पुढे नेऊन रिचर्डस् मागून पुढे येणाऱ्या आपल्या बॅटचा झोका पूर्ण करी. . . आणि मग बघायला मिळे एक सुंदर चौकार ! आपल्या चेंडूवर असा प्रहार होऊ नये म्हणून गोलंदाज चेंडूचा टप्पा जरा आखडीत !... अशा वेळी बघावा स्क्वेअर कट ! चेंडू पॉईंटच्या क्षेत्ररक्षकाला हुलकावणी देऊन केव्हाच सीमापार झालेला असे ! शेवटी गोलंदाजाचे 'ॲनालीसीस' बिघडायचे ते बिघडेच ! आपले हे फटके हुकमी असावेत म्हणून रिचर्डस्‌न "रियाझही" खूप केलेले आहे.

१९६७–६८ची गोष्ट. नाताळ विरुद्ध ट्रान्सव्हॉल असा एक सामना होता. त्या सामन्यातील पहिल्या डावामध्ये रिचर्डस्‌ची सुरुवात बिघडली. त्याचे फटके काही बरोबर बसेनात. रिचर्डस् बेचैन झाला. कसाबसा १३ धावा काढून तो दिवसअखेरीला नाबाद राहिला. दुसऱ्या दिवशी सकाळी ८ वाजताच तो मैदानावर गेला. बरोबर त्याने बटलरला घेतले होते. मैदानावर मग एक सरावाचे जाळे लागले गेले आणि रिचर्डस् खेळू लागला. बटलरने मार्गदर्शन करावे व रिचर्डस्‌ने आपले दोष सुधारण्याचा प्रयत्न करावा. ९० मिनिटांच्या मेहनतीनंतर रिचर्डस् माघारी परतला. आणि मग तो सामन्यात खेळला किती सफाईने ! त्याने बहारच उडवून दिली. कच्चे दुवे पक्के केल्याने त्या दिवशी रिचर्डस् ४५ धावापर्यंत मजल मारू शकला !

**इंग्लिश जनतेवर छाप पाडली**

हीच तयारी तो इंग्लंडमध्ये घेऊन गेला. एक सोबर्स सोडा,



अनुक्रमणिका










अनुक्रमणिका

कारण त्याचे सगळेच न्यारे आहे, अद्वितीय आहे, अलौकिक आहे, पण त्याच्या खालोखाल रिचर्डस् हाच इंग्लंडमध्ये आज लोकप्रिय झालेला आहे. सोबर्सच्या खालोखाल त्याने लोकमतावर छाप पाडली आहे. आपली निराळी प्रतिमा साकार केली आहे. रिचर्डस्चे गणित सोपे असते. मन लावून खेळले की धावा होतात हा त्याचा सरळ हिशोब असतो. १९६९ मध्ये त्याने या गणिताच्या जोरावरच इंग्लिश हंगामात २३९५ धावा काढून दाखवल्या आणि सरासरी गाठली ४७.९० धावांची ! इंग्लिश फलंदाजानाही रिचर्डस्च्या धावांची बेरीज अनुल्लंघ्य ठरली ! रिचर्डस् लोकप्रिय झाला ते उगीच नाही !

इंग्लंडमध्ये क्रिकेट उतू जाईपर्यंत खेळले जाते असा जो एक सार्वत्रिक समज आहे त्याच्याशी रिचर्डस् सहमत आहे. तो म्हणतो, "हे इंग्लिश खेळाडू वर्षानुवर्षे सतत चार चार महिने क्रिकेट कसे खेळतात हेच समजत नाही !" कारण दररोज खेळण्याचा ताण खेळाडूवर निश्चित पडतो. माझ्या पहिल्या हंगामात मी तर अगदी वैतागून गेलो. रोज सकाळी उठल्यावर म्हणायचो, "आता उद्या काही आपण क्रिकेट खेळणार नाही !"

परंतु हाच वैतागलेला रिचर्डस् आज लागोपाठ दोन वर्षे इंग्लिश भूमीवरील उन्हाळ्यात चार चार महिने रोजचे क्रिकेट खेळतो आहे. अगदी विनतक्रार ! उलट प्रत्येक नव्या नव्या सामन्यात काही तरी नवे मिळवतो आहे . . .आणि नवे देतो आहे ! मिळवतो आहे अनुभव आणि देतो आहे आनंद ! मिळवतो आहे तंत्रातील अचूकता आणि देतो आहे एक वाढते समाधान ! अजूनही इंग्लिश हंगामात तो आपली एकाग्रता टिकवून आहे. एवढेच नव्हे तर फलंदाजावरोबरच त्याने स्लीप फिल्डींगमध्ये कौशल्य संपादन केले आहे व नाव मिळवले आहे.

इंग्लंडमध्ये रिचर्डस्चा एक फायदा झाला. स्वदेशातील विकेटस्वर तो हुकमी ऑफ ड्राईव्हज् मारायचा. पण लेगकडचे टोले त्याला अजून पारखेच होते. ते तो इंग्लंडमध्ये शिकला. ऑफप्रमाणे त्याने लेगसाईडही सामर्थ्यशाली केली.

आता रिचर्डस्ची क्षितिजे व्यापक झाली आहेत. ऑफपासून लेगपर्यंतचा आसमंत त्याने बॅटीच्या कह्यात घतला आहे. त्याचे प्रगतीचे क्षितीजही असेच लांबवर पसरलेले आहे.

१९७० सालच्या सुरवातीला ऑस्ट्रेलियाचा संघ दक्षिण आफ्रिकेच्या दौऱ्यावर गेला हे तुम्हाला ठाऊकच आहे. रिचर्डस् किती तरी दिवस टेस्टच्या उंबरठ्यावर उभा होता. ऑस्ट्रेलियन् संघ येताच त्याला एक नवी संधी मिळाली.

रिचर्डस् चारी टेस्टस् खेळला आणि त्या चारी टेस्टस्मध्ये त्याने धावांची उधळण केली. त्याच्या धावा अशा झाल्या––

पहिली टेस्ट–२९ व ३२, दुसरी टेस्ट १४०, तिसरी टेस्ट–६५ व ३५, चवथी टेस्ट–८१ व १२६– एकूण धावा ५०८, शतके २, अर्धशतके २, सरासरी ७२:५७ धावांची ! सरासरीत त्याचा दुसरा क्रमांक लागला. पहिल्या क्रमांकापेक्षा त्याच्या धावा फक्त ९ नेच कमी झाल्या ! पहिल्या क्रमांकाची सरासरी झाली ७३:८५ व रिचर्डस्ची झाली ७२:५७ तिसरा क्रमांक लागला वार्लोचा– त्याच्या एकूण धावा झाल्या ३६०, म्हणजे रिचर्डस्पेक्षा १४८ ने कमी. आणि वार्लोची सरासरी झाली ५१:४२–म्हणजे रिचर्डस्पेक्षा सुमारे २१ ने कमी ! केवढा हा फरक !

या आकड्यांवरुन रिचर्डस्ची प्रतिमा नजरेसमोर उभी राहाते. टेस्टमधील पहिल्या पदार्पणातील प्रयत्नातच रिचर्डस् हे यश गाठले ही जाणीव त्याची प्रतिमा एकदम उजळून टाकते.

पहिल्या टेस्टमध्ये दुसऱ्या डावात त्याने ट्रेव्हर गोडार्डबरोबर ५२ धावांची आघाडीवरील भागीदारी केली. दुसऱ्याही टेस्टमध्ये त्यांची भागीदारी अर्धशतकाच्या पुढे गेली. (८८) तिसऱ्या टेस्टमध्ये दोन्ही डावात भागीदारीने अर्धशतक ओलांडले. तर चौथ्या टेस्टमध्ये आघाडीच्या जोडीने कहरच केला. पहिल्या डावात धावा केल्या १५७ व दुसऱ्या डावात केल्या ७३. पण यावेळी गोडार्ड व रिचर्डस् अशी जोडी नव्हती–तर होती वार्लो व रिचर्डस् ही जोडी. ऑस्ट्रेलियाच्या लॉरी-स्टॅकपोल यांच्या भागीदारीने एकदाही शंभरीला स्पर्श केला नाही, पन्नाशीला स्पर्श केला दोनदाच !

### मैदानावर धावांचे वादळ

ह्याच टेस्टमालिकेतील दुसऱ्या कसोटी सामन्यात एक अविस्मरणीय प्रसंग घडला. २ बाद १२६ धावा झाल्यावर रिचर्डस् व ग्रॅएम पोलॉक यांची जोडी जमली. ५ फेब्रुवारी १९७० या दिवसाची ती दुपार होती. लंच नुकतीच संपली होती. प्रेक्षक आपापल्या जागावर येऊन बसतात न बसतात तोच त्यांना मैदानावर धावांचे सुटलेले वादळ पहायला मिळाले. ६० मिनिटांत रिचर्डस्–पोलॉक या जोडीने १०३ धावांची भागीदारी केली आणि प्रेक्षकांच्या डोळ्यांचे पारणे फेडले. ती एक अविस्मरणीय दुपार होती ! दोघेही फलंदाज म्हणजे कसबी कलाकार वाटत होते. पोलॉक हा जुना गाजलेला वीर होता. तर रिचर्डस् नुकताच उगवत होता. त्या दोघांनी ५० धावा तर ३० मिनिटात झळकवल्या आणि भागीदारीचे शतक एका तासात उभारले. उगीच नाही नेव्हील कार्डस् रिचर्डस्ची स्तुती करीत ! कार्डस्च्या मते रिचर्डस् हा आजचा एक थरारक फलंदाज ठरतो.

त्यानंतर यंदा जून महिन्यापासून इंग्लंडमध्ये एका नव्याच मालिकेला प्रारंभ झाला. दक्षिण आफ्रिकेचा नियोजित दौरा रद्द झाल्याने इंग्लंडचा संघ "शेष विश्व संघाशी" पाच सामने खेळला. या मालिकेत शेष विश्व संघाकडून रिचर्डस्ची 'आघाडीचा फलंदाज' म्हणून निवड झाली. रिचर्डस् व वार्लो हीच दक्षिण आफ्रिकेची आघाडी-जोडी 'शेष विश्वसंघाची' आघाडी जोडी ठरली. हीच जोडी आज जागतिक क्रिकेटमध्ये श्रेष्ठ ठरते असे म्हणायला हरकत नाही.

पण या मालिकेत रिचर्डस् पूर्वीसारखा चमकला नाही. त्याच्या एकूण धावा २५७ झाल्या. सर्वोच्च झाल्या ६४ आणि सरासरी पडली ३६.७१ धावांची. या मालिकेत रिचर्डस्च्या धावा कमी भरल्या असल्या तरी आजच्या सर्व आघाडी फलंदाजात रिचर्डस् हा जास्त तडफदार ठरतो यात वाद नाही. ●●●



अनुक्रमणिका

# स्मरणे ओलावती नेत्र



कै. य. ह. पिटके

वृत्तपत्र-प्रसिद्धी-प्रचार व पर्यायाने जनजागरण अशा व्यवसायात वर्षानुवर्षे असलेली, स्वतःचे व्यक्तित्व त्या त्या ठिकाणी उमटवून गेलेली अशी तीन माणसे नुकतीच देवाघरी गेली. त्यातले कै. **य. ह. पिटके** हे महाराष्ट्र राज्य शासनाचे प्रसिद्धि संचालक होते. तर कै. **श्रीकान्त पालेकर** हे मराठीतल्या 'नवशक्ति' ह्या गाजलेल्या दैनिकाचे माजी संपादक व मृत्युसमयी 'नवाकाळ'मधील सहाय्यक संपादक होते. तिसरे पत्रकार होते कै. **त्र्यंबक कृष्ण तर्टे** ! ह्या तिन्ही व्यक्तींचा मृत्यु काही दिवसांच्या अंतराने घडून आला. त्यातले त्र्यंबक तर्टे यांनी आपल्या पत्रकर्तृत्वाची सुरुवात जरी मुंबईत केली असली तरी गेली अठरा वर्षे ते मुंबईबाहेरच होते. त्यामुळे मुंबईच्या पत्रसृष्टीत जरी 'तर्टे' परिचित होते तरी सर्वसामान्य वृत्तपत्रवाचकापासून ते दूरच होते. प्रसिद्धी संचालन हा शासकीय माग ! त्यातल्या जनतासंपर्काला काही शासकीय मर्यादा; त्यामुळे कै. पिटके हेही जनतेच्या संपर्कात काही एका मर्यादित प्रमाणातच आले. क. पालेकर हे नाव संपादक म्हणून 'नवशक्ति' दैनिकावर काही वर्षे झळकत असले तरीही पालेकर वृत्तीने शांत होते. ते नगरसेवक होते, सामाजिक, राजकीय पक्षात कार्य केलेले गृहस्थ होते तरीही पालेकरांचे एकूण व्यक्तित्व सौम्य, शांत व संयत असेच होते. पालेकरांना मी गेली वीस वर्षे पहात आलो आहे. पालेकर काही 'गर्दी'चे गृहस्थ नव्हते. त्यामुळेच ह्या तिन्ही मृत्यूत काही एक समान दुवा दिसतो. कै. पिटके, पालेकर, तर्टे ही तिन्ही माणसे 'पत्र'-जीवनाशी नाते–जीवाभावाचे नाते असलेली आणि तरीही 'तुफान प्रसिद्धी' वा 'नेहमीच प्रकाशातली' अशी नव्हती. आणि म्हणूनच त्यांच्या मृत्यूने वृत्तपत्रव्यवसायाची वा प्रसिद्धी माध्यमाची जी हानी झाली आहे तिचे रूप स्पष्ट करणे अगत्याचे वाटते. कै. य. ह. पिटके यांनी एम्. ए. झाल्यावर नागपूरच्या 'हितवाद' दैनिकात (इंग्रजी) काही वर्षे काम केले. नंतर त्यांनी अकोल्याच्या 'मातृभूमी' व नागपूरच्या 'तरुण भारता'त काम केले. प्रसिद्धी संचालनाची पायाभरणी ही नेहमीच वृत्तपत्राच्या कार्यालयात होत असते. पिटके याजबाबत तेच घडले. १९४४ साली ते मध्य-प्रदेशाच्या प्रसिद्धी खात्यात नौकरीस लागले. १९६५ साली महाराष्ट्र शासनाचे ते 'प्रसिद्धी संचालक' झाले. पिटके हेही शांत स्वभावाचे, निगर्वी वृत्तीचे आणि आतिथ्यशील असे गृहस्थ होते. प्रसिद्धी संचालक कल्पक, द्रष्टा असा असावा लागतो. पिटके तसे होते. त्यांच्या मृत्यूने राज्याची हानी झाली आहेच. पण 'प्रसिद्धी-विभागा'चे नुकसान मोठे आहे.

कै. श्रीकांत पालेकर हे नाव मुंबईकरांना तसे सुपरिचित. आणि तरीही खूप संपर्कातले नाही. पालेकर तसे अबोलच होते. क्वचित बोलले तरी गरजेपुरते, मुद्यापुरते, बोलणे अघळपघळ असे मुळी नाहीच. हसणे हेही एखाद्या लाजाळूच्या झाडासारखे ! दिलखुलास हसलेलंही मी पालेकर यांना पाहिलं नाही. पालेकरांचं व्यक्तित्व तसं 'झंझावाती' नव्हतं. पण मिश्किल होतं. निष्ठा, मूल्ये मानणारं होतं. 'नवशक्ति' दैनिकातले 'धक्के-बुक्के' हे ते लिहीत होते. ही एकच गोष्ट ह्या संदर्भात पुरेशी बोलकी आहे. 'अभिरूप लोकसभे'-तही ते मोजकेच पण मिश्किल बोलत. नेट लावून, बैठक मारून ते तासन् तास कामे करीत हे मी पाहिले आहे. 'ज. म. का.' सदरही त्यांनीच जोपासले होते. पालेकर संपादक होते पण पालेकरांजवळ 'संपादकीय लेखणी' नव्हती. त्यांनी कधी 'श्रीकान्त पालेकर' या नावाने (महाजनी, गाडगीळ, पाध्ये, तळवलकर याप्रमाणे) टीका-टिप्पणी लिहिली नाही. चौफेर दृष्टी होती. चिंतन होते. क्रियाशील मन होतं. स्वातंत्र्य लढ्यात म्हणूनच ते तटस्थ नव्हते. राहूच शकले नाहीत.

कै. त्र्यंबक कृष्ण तर्टे हे मूळचे इंदोरचे. त्यांचे एक मोठे बलस्थान म्हणजे कुठल्याही भाषणाचा यथातथ्य वृत्तांत ते देत असत. फार मोठ्या व्यक्तींची प्रशस्तीपत्रे त्यांना लाभली. हे रिपोर्ट तुम्ही का घेता ? असे मी त्यांना विचारले. त्यांनी चोपडी दाखविली. ते सारे अहवाल मोडीत होते. तर्टे यांची 'मोडी' ही मोठी ताकद होती. तर्टे हे स्वभावाने गरीब, सोशल, जुळवून घेणारे. तर्टे यांना लौकिक भाषेत 'पर्सनॅलिटी' नव्हती आणि तरीही स्वतःचे असे कर्तृत्व व व्यक्तित्व होते. मुंबई सोडल्याने त्यांची पावले पत्रसृष्टीत पुढे पडली. 'गोमंतक'मध्ये असतानाच ते गेले. वय काही फार नव्हतं. पण आयुष्य तसं कठीण, संघर्षमय आणि तरीही तर्टे 'कंपनी'ला फार ॠज होते. हास्यविनोदात रमणारे, स्नेहशीलतेने विश्वासात घेऊन बोलकं करणारे असे तर्टे होते. अखेर पर्सनॅलिटी म्हणजे काही नुसता 'देह' नाही–देहांतर्गत गुणवत्ता हीच पर्सनॅलिटीला रंग-रूप देत असते. तर्टे यांच्या सहवासातल्या काही रम्य आठवणी आजही स्मरतात. ह्या तिघांच्याही आत्म्याला सद्गती लाभो अशी 'दीपावली'च्या वतीने प्रार्थना!

— आदित्य






(पान ८ वरून–**संतश्रेष्ठ नामदेव**)

ताणल्यामुळे मोठ्या माणसांनी भीतीने त्यांना सोडून देण्याची केलेली विनंती; एकमेकांवर पाण्याचे फवारे उडविणारे, प्रतिबिंबे पहाणारे गोपाळ या सार्‍यांचे शब्दचित्र मनोहर उतरले आहे. म्हणूनच नामदेवांच्या कवितेत शब्द वा व्यक्तिचित्रण करण्याचे फार मोठे सामर्थ्य आढळून येते. आजच्या पद्धतीने वास्तव वर्णनाचेही त्यांना वावडे नाही. म्हणूनच मूतून जमीन सारवणारे, वाकुल्या दाखविणारे, श्वानाला यू यू करून मिठी घालणारे कृष्ण बलराम रेखाटताना बाल्याची निरागस प्रतिमा उभी केली आहे. नामदेवांच्या वास्तव चित्रणाचा आणखी एक गुण आहे. एका दृष्टीने भाषेची वास्तवता न डागळणारे नामदेव हे पहिले लक्षणीय मराठी कवी होत. बोबड्या पेंद्याची भाषा मुद्दाम बोबडी ठेवली आहे. '... । भली ले गोविंदा युक्ती केली । उदलांले वेत्या कलुं नको गलवला । थांवालिलो गोला लोनियाचा' अशा सच्च्या भाषेचे आविष्कार पुष्कळ पाहायला मिळतात. 'कुत्ला थंमाल ले थमाल अपुल्या गाई' हे गीत तर महाराष्ट्रात पुष्कळ प्रसिद्ध आहे.

कालाकालातून काव्याकडे पाहाण्याचे दृष्टीकोन बदलत जातात. आज कवितेची चर्चा करताना त्यातील प्रतिमासृष्टीचा विचार प्रामुख्याने होतो. प्रतिमेची चर्चा अलीकडची असली तरी प्रतिमांचे अस्तित्व काव्यात प्रारंभकाळापासूनच असते. नामदेवांच्या सातशे वर्षांपूर्वीच्या काव्यांतील प्रतिमासृष्टी ताज्या पारिजातकाच्या कळीसारखी तजेलदार आहे. केव्हा केव्हा ती कमालीची हळुवार बनते. 'भूमीचें मार्दव सांगे कोंभाची लवकलव' मध्ये किंवा 'सरोवरी कमळे तसे तुझे नेत्र' यामध्ये त्यातल्या नाजुकपणाची जाणीव होते; तर केव्हा केव्हा प्रतिमासृष्टी अत्यंत राकट तीव्र बनते.

मूर्ख बैसले कीर्तनीं । न कळे अर्थाची करणी ॥
घुबड पाहे भलतीकडे । नाइके नामाचे पवाडे ॥
पाहूं इच्छि परनारी । चित्त पादरक्षावरी ॥
नामा म्हणे सांगूं किती । मूर्ख सांगितलें नाइकती ॥

यांतील 'घुबडा'ची प्रतिमा तीव्रतेची द्योतक होय. नामदेवांच्या प्रतिमासृष्टीला नेमकेपणा व विविधता आहे. 'शरीर काळाचे मातुकें'; 'जैसें डोंगरीचें झाड त्यांचें जन्म जालें वाड' 'भुजंगाचे मुखीं अमृत घातलें । फिरोनी पाहिले विषमय';

'केळीच्या पाठीवरी ठेविला दोडका'

पैल पिकली पंढरी, विठुरायाची नगरी;

इत्यादी अनेक प्रतिमा काव्यलावण्याने भरलेल्या आहेत. केव्हा केव्हा एखाद्या चपखल दृष्टान्ताने नामदेव आपला भावार्थ कमालीचा सुगम करून टाकतात. परमेश्वर व आपण भक्त यांचे नाते सांगताना 'हस्तीचिया चरणावरी बसे माशी' असा उल्लेख ते करतात. या प्रतिमेत मूलगामी असलेली विरोधाची धार लक्ष्यात यायला क्षणाचाही विलंब लागत नाही. व जे काही मनात म्हणायचे आहे ते सर्व पूर्णपणे व अल्पाक्षरी पद्धतीने सांगितले जाते. 'पंढरी माहेर विठ्ठल माउली' हीही एक अशीच बोलकी रचना आहे. कारण स्त्रीला माता व माहेर याहून जवळ असे भावनात्मक पण निर्मळ असे जगात दुसरे काय आहे? अशा लेखनावरून नमके शब्द वापरून अथवा प्रतिमा वापरून नामदेव आशय कसा प्रासादिक बनवतात ते लक्ष्यात येते. माणसाच्या जीवनव्यवहारातला विचित्र विरोध जेव्हा ते व्यक्त करतात तेव्हासुद्धा शैलीचा असाच नमकेपणा प्रत्ययाला येतो. आपली कृती लक्ष्यात न घेता दुसऱ्याच्या कृतीवर टीका करणाऱ्याबद्दल सांगताना नामदेवांनी वापरलेला दृष्टांत अत्यंत चपखल वाटतो. संन्यास ही बाह्य स्थिती आहे तर वैराग्य ही मनस्थिती असते हे विशद करताना वापरलेला चंद्रबिंब प्रकाशाचा दृष्टान्त या दृष्टीने पहावा. विशेषतः कीर्तनकार वैराग्यशील असावा पण तो तसा असत नाही अशी खंतही या अभंगातून सहजपणे व्यक्त केली गेली आहे. एखाद्या वेळी संपूर्ण दीर्घ प्रतिमामालिका वापरून ते अर्थाला केवढी भव्यता आणतात तेही पाहाण्यासारखे आहे. साडे-तीन हात देह म्हणजे एक खोपट होय; खरे पाहिले तर ह्या घरादाराचा मालक कुणी वेगळाच आहे; वारा वादळ येताच हे खोपट मोडून जाणार आहे. भिंत खचेल, पाया ढासळेल असल्या फुसकट घराबद्दल चित्तात प्रेम कशाला असा विचार मांडणारा हा अभंग शैली, प्रतिमा, सुबोधता इत्यादी वाङ्मयीन अंगांनी सजून राहिला आहे.

नामदेवांच्या प्रतिमासृष्टीत सागर, बेडूक, वृक्ष वेली, पाऊस पाणी, शेतीवाडी, अमृत विष; चंद्र सूर्य, भुजंग वा घुबड; केळी दोडका, मृगजळ, अग्नी, वात व दीप; काळा रंग, अशा विविध जीवन व्यवहारातल्या प्रतिमांचा वापर होतो. अनेकदा वरवर प्रतिमा पुनरावृत्त झाल्यासारख्या वाटतात. परंतु त्या तशा झालेल्या नसतात. त्या प्रतिमांचा संदर्भबिंदू वेगळा असतो. एखाद्या सहजगत्या येणाऱ्या प्रतिमेने अभंगाला कशी शोभा येते ते

'जैसा वृक्ष नेणे मान अपमान । तैसे ते सज्जन वर्तताती ॥
येऊनियां प्राणी पूजा जे करिती । त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ॥
अथवा कोणी प्राणी येऊनि तोडिती । तया न म्हणती छेदूं नका ॥
निंदास्तुती सम मानिती जे संत । पूर्ण धैर्यवंत सिंधू जैसे ॥
नामा म्हणे त्यांची जरी होय मिठी । तरी जीवशिवा मिठी पडुनि जाय ॥

संत माहात्म्य सांगणाऱ्या ह्या अभंगात 'वृक्ष' प्रतिमा कशी विकसित करीत नेली आहे ती पाहाण्याजोगी ठरते. ज्ञानदेवांच्या प्रतिमेशी ज्याच्या प्रतिमेची जातकुळी तंतोतंत जुळते अशी ही एक सहजसुंदर रचनानिर्मिती होय. भावकाव्याचा इतिहास लक्ष्यात घेतला तर पुष्कळदा ध्रुवपदाचे सामर्थ्य लक्ष्यात येते. नामदेवांच्या काव्याची शैलीच गीतप्रधान आहे. अभंग छंदाची घडणच पुष्कळठिकाणी तशी होत जाते. नामदेवांच्या अशा अक्षरशः सहस्रावधी ध्रुवपद रचना आढळतील की त्यांतून भाव नुसता ओथंबत राहातो. 'भवसागर तोडितां कां रे करितसां चिंता', 'हें गे आयुष्य हातोंहातीं गेलें, आंगीं आदळलें जन्म मरण', 'देवाचे हे आत्मे जाणावे ते संत', 'झळझळित सोनसळा, कळस दिसतो तेजाळा,' 'मल्हार महुडें गगनीं

दाटलें' इत्यादी प्रथम चरण वाचकाचे लक्ष्य एकदम वेधून घेतात. दृश्य, चित्र, श्रुति, स्पर्श इत्यादींनी नटलेली नामदेवांची कविता भोळा भाव, मनोनिर्धार, शरणागति, आनंद, चिंता, दुःख, तृप्ती यांच्या आकर्षक व सत्प्रत्ययी निवेदनांनी सुशोभित झाली आहे. नामदेवांचे केवळ कवी म्हणूनसुद्धा जे महत्त्व आहे ते या अशा प्रसन्न प्रासादिक अभंगामुळे आहे. भक्तिभावनेचा इतका रम्य आविष्कार त्यापूर्वी आढळत नाहीच; परंतु नंतरही क्वचितच. नामदेवांचे कार्य तुकोबांनी केले असे म्हटले जाते. परंतु तुकारामांनी केलेल्या भावदर्शनात भोळ्या भावासंगेच कडकपणाही आला आहे. तुकारामाची वाणी अयोग्य घटनेच्या संदर्भात आसूडाच्या फटक्या-सारखी जहाल बनते. त्याचे अस्तित्व नामदेवी रचनेत नाही.

महाराष्ट्रात नामदेवांच्या मराठी अभंगांचे जसे स्थान आहे. तसे त्यांच्या अमराठी रचनेला अन्यत्र आहे. या अमराठी रचनांचे स्वरूप पुढील प्रकरणात पाहाणे योग्य ठरेल.

* * *

(पान १० वरून—**वा. भ. बोरकर**)

कारणांचा शोध आपल्याला लागेल. एक कारण असे की, बोरकरांजवळ डोळस श्रद्धा आहे. अश्रद्धेच्या आणि 'हिप्पी'वादाच्या आजच्या काळात जुनी वा जुनाट वाटावी, अशी श्रद्धा आहे. दुसरे कारण म्हणजे त्यांचे पाय ह्या 'काळ्या मातीत' घट्ट रोवलेले आहेत. भारतीय तत्त्वज्ञान पचवलेला—रिचवलेला व त्यातल्या सौंदर्याने धालेला असा हा कवि आहे. अखेर 'कविता लिहितो' हा बाह्य उपचार झाला. पण—पण का, कशी हे प्रश्न प्रत्येक कलाकाराला सताव-तातच. त्याची उत्तरे शोधून काढावीच लागतात. त्या शोधासाठी वाचन, चिंतन, मनन लागते आणि स्वतःशीच संवाद करावा लागतो. ते सारे बोरकरांनी केले आहे याचा सुरेख प्रत्यय बोरकरांची ही दोन्ही भाषणे देतात. बोरकर काळाबरोबर चालत राहिले. समाजाच्या स्थिति—गति—प्रगती यावावत ते कधी उदासीन नव्हते व नाहीत. त्यामुळे काळाचे ठसे झेलीत झेलीत, अनुभव घन होत होत हा कवी वाढला. महाबळेश्वरच्या भाषणात अनेक 'लौकिक' विषय व आनु-षांगिक चिकित्सा येऊन गेली आहे. तर खारचे भाषण हे कवीचे 'स्वगत'च आहे असे म्हटले पाहिजे. अखेर चाळीस वर्षे सतत कविता लेखन केल्यानंतर आणि कवितेला 'लय-योग' म्हटल्यानंतर बोर-करांसारख्या निसर्गवेड्या व सौंदर्यवेधी वृत्तीच्या, चिंतनशील कवीकडून हे 'स्वगत' अपेक्षीतच होते. 'नवी-जुनी कविता' असले कलांबाह्य निकष गृहित धरून ठेवल्या जाणाऱ्या चर्चा परिसंवादांपेक्षा हे चिंतन मला अधिक मूलगामी व मौलिकही वाटते.

काव्य (वा साहित्य) निर्मितीची प्रक्रियाच एकूण गूढ-रम्य अशी असते. तिला व्याख्येच्या वा यम-नियमांच्या चौकटीत बसविण्याचा वा असलेल्या चौकटीत वा व्याख्येत त्याचे मूळ शोधण्याचा प्रयत्न खरा नव्हे. अखेर हे गूढ उकलण्याचा प्रयत्न जेव्हा होतो तेव्हा माणूस सृष्टीचेच जणु गूढ उकलून दाखवू शकतो. तांब्यांच्या कवितेतही असेच 'अध्यात्म' सुंदर रूप घेऊन आले आहे. बोरकरांच्या ह्या खारच्या स्वगतातही नेमके अध्यात्मही आहे आणि सुंदरताही आहे. ते म्हणतात "ज्याच्यावर ती (काव्यकला) भाळते त्याला ती अलौकिकाची जाणीव मिळवून देते. तो मग केवळ कवि रहात नाही. संतही होतो. आपल्या देशात तरी वारंवार हे असे घडत आले आहे. कवि जगात इतर ठिकाणीही झाले आहेत. पण त्यातले संत झाले असे फारच थोडे. असे का व्हावे? मला वाटते हा फरक काव्याकडे पाहण्याच्या दृष्टीमुळे पडतो. काव्य ही अध्यात्मिक साधना आहे. आत्मविद्येचा हा एक आगळा व लोभसवाणा आविष्कार आहे, लययोगाची ही एक हृदयंगम कला आहे असे ज्यांनी मनापासून मानले आणि या साधनेची वाट जे शोधीत चोखाळीत राहीले ते संत झाले आणि ज्यांनी काव्य-कला हा एक षौक मानला किंवा छंद मानला ते कवीच राहिले किंवा कवि म्हणून देखील फार लवकर संपले असे तुम्हाला आढळून येईल."

खऱ्या कवीसंबंधातली आपली प्रतिक्रिया व्यक्त करताना ते म्हणतात की तो जीवना-वर विलक्षण अनुरक्त असतो. सृष्टीचे ऋतुनाट्य, माणसाचे भावनाट्य आणि त्याच्या सर्जकतेचे स्वप्ननाट्य ही सारी त्याला सारखीच भावीत असतात. त्या-मुळेच जीवनातील सुखांइतकेच त्याला त्यातील दुःखही लोभसवाणे वाटते आणि संतोषाइतकाच क्षोभदेखील प्रेरक व प्रबोधक वाटतो. जीवमात्रावर आणि सृष्टिमात्रा-वर प्रेम केल्याशिवाय त्याला जगताच येत नाही—त्याला वाटते आपण एका विराट लावण्योत्सवात सापडलो आहोत"—हे सारे विवेचन काव्यात्मही आहे व विचारघनही! 'स्वान्तः सुखाय' लिहितो म्हणणारांनी हे विवेचन मुळातच वाचावे.

परमनप्रवेशाच्या संदर्भात त्यांनी मांड-लेले एक सूत्रही तसेच महत्वाचे आहे. ते म्हणतात, "बारकाईने पाहिले तर ही साधना एका बाजूने जशी विश्वतद्रूपतेची आहे तशीच ती अहंविलोपनाचीही आहे."

काव्यसाधनेबद्दलचे बोरकरांचे विवे-चनही मुद्दाम देण्यासारखे आहे. ते म्हणतात, 'ही साधना जशी ज्ञानी, मुनी किंवा योगी यांच्या पद्धतीची नाही. तशीच ती संसारी माणसाची किंवा संन्याशाचीही नाही. संसार आणि संन्यास हे आपापल्या परीने तसे सोपे आहेत. व्यवहार नीट सांभाळला तर संसार जमतो. तो पुरता फेकून दिला की, संन्यास साधतो. पण ही साधना अशी की, येथे संसारात राहून संन्यास भोगावा लागतो. संसाराचा रस घ्यायचा पण त्याच्या गाळात स्वतःला रुतू द्यावयाचे नाही. संन्यासाचा आनंद लुटायचा पण त्याचा सुतकीपणा स्वतःला शिवू द्यायचा नाही. जीवनाच्या प्रेमाने मोहरून जायचे पण आतला एकांत ढळू द्यायचा नाही. आंब्याच्या कोवळ्या पानाप्रमाणे मोहाच्या हळुवार झुळकेने-

देखील थरकून उठायचे पण तो झंझावात होऊन आला तरी देठाला तुटायचे नाही. चिखलात उतरून कमळे काढावयाची आणि पाय धुवून चालू लागायचे अशी ही एक और आनंद साधना आहे.. वस्तुतः देव दानव आणि मानव माणसातच आहेत. त्यांच्या शक्ति केंद्राचे परस्परांशी एक गूढ नाते आहे. ते जोपर्यंत माणसाला उमगले नाही तोपर्यंत या शक्ति माणसाच्या मनोभूमीवरसारखे रण माजवीत असतात."

"प्रयास न करता देहभावाचा विसर पाडून घेण्याची युक्ति गवसल्याशिवाय कवीला आपल्या साधनेत विमग्न राहता येत नाही."

शरीर, मनाच्या व कवितेच्या चिरतारुण्याचा जणु अभिमंत्रच बोरकरांनी स्वानुभवाचे दाखले देत, भाषणात सांगितला आहे. प्रज्ञाकेंद्र, हृदय केंद्र, नाभिकेंद्र, ही सारी परिभाषा आणि ह्या भाषणात आलेले विचार बोरकरांचे सौंदर्यवेड वा वंध वरवरचा वा उथळ नाही. ते संद्रियांनी पाहून अतींद्रिय अशा मन बुद्धीने पाहून शब्दांकित करणाऱ्या चिरनव, महाकवीचा आहे याचा प्रत्यय देऊन जातात. त्यांनीच एका ठिकाणी म्हटल्याप्रमाणे "सौंदर्याचा साक्षात्कार व त्यातून जीवनाचे रहस्य जाणून घेणारी शोधक बुद्धी ही माझ्यात व तांब्यांच्यात एक आहे. त्यांच्यात माझा समानधर्म मला भेटला होता" हे विधान प्रस्तुत भाषण व 'बोरकरांची कविता' वाचल्यानंतर येतो. बोरकर कवि, कथाकार, कादंबरीकार, लघुनिबंधकार, अनुवादक, भाष्यकार आहेतच. पण बोरकरांचा पिंड हा ज्ञानी तत्वचिंतकाचाही आहे. ते तत्वचिंतन किती काव्यात्म होऊन येते याचा प्रत्यय खारचे भाषण देऊन जाते. कवितेची परिभाषा कवीच्या व्यक्तित्वाचा एक अविभाज्य भाग असतो. बोरकरांचे भाषण 'बोरकरांचेच भाषण' आहे ही ग्वाही शब्दाशब्दातून मिळते. चिरनव, चिरतरुण आणि काळ्या मातीत पाय घट्ट रोवून उभ्या असलेल्या बोरकरांचे साठीच्या निमित्ताने अभिनंदन करतो. आणि आमचे बा. भ. बोरकर आणि कविवर्य बोरकर ह्या दोन वाटणाऱ्या पण एकात्म असणाऱ्या व्यक्तित्वाला दीर्घायुरारोग्य लाभो ही प्रार्थना करतो.

•••



अनुक्रमणिका








# पुन्हा एकदा भारतात बॅ. जीना

अग्रगण्य कायदेपंडित, व्यवहारवादी राजकीय नेते, मुस्लिम जमातीचे एकमेव प्रवक्ते, पाकिस्तानचे द्रष्टे शिल्पकार म्हणून बॅ. महंमदअली जीना यांना अवघा भारत आजही ओळखतो. 'मुस्लिम लीग' ह्या हत्याराचा वापर करून आणि काही वाटाघाटी तर काही 'बलप्रयोग' करून त्यांनी "पाक"ला आकार दिला ही झाली वस्तुस्थिती ! परंतु तेवीस वर्षानंतरही पाकिस्ताननिर्मिती हा 'इतिहास' होऊ शकलेला नाही ! पाकची दाट छाया आजही आमच्या भूभागावर, मनावर, राजकारणावर आहे हे सत्य नाकारण्यात काही हंशील नाही. त्या दृष्टीने वारंवार बदललेल्या (पाक) पंतप्रधानांची सारीच नावे जरी आमच्या स्मरणात राहिली नसली तरी पाकचे शिल्पकार म्हणून बॅ. जीना, कराराच्या खोड्यात आमची मान अडकवून ठेवून निर्वासितांचे लोंढे भारताकडे पाठविण्याची व्यवस्था करणारे लियाकत अली, भारतावर कच्छ, काश्मीर, पंजाबमधून १९६४।६५ मध्ये स्वारी करून कच्छ-ताश्कंद कराराचा 'ट्रॅप' उभा करणारे अध्यक्ष अयूबखान यांची स्मृती भारतीय कधी विसरू शकतील असे वाटत नाही. अधुनमधून ही तीन्ही नावे आपल्या राजकीय क्षितिजावर झळाळून जातातच. परंतु आपल्या शैक्षणिक संस्थेबाबत यातले एखादे नाव पाक निर्मितीनंतर घेण्याचा व त्यावर वादंग घालण्याचा प्रसंग कधी काळी येईल असे मात्र वाटले नव्हते. परंतु मुंबई विद्यापीठाला बॅ. जीना यांच्या मृत्युपत्रान्वये पन्नास हजारांची देणगी देण्यात आल्याने मुंबई, महाराष्ट्रात मात्र प्रचंड वादळ उठले आहे. आणि ह्याबाबतची जी माहिती आता उपलब्ध झाली आहे तीवरून हे वादळ उठण्याची भीती वाटली म्हणून म्हणा किंवा काही अज्ञात कारणांनी हे प्रकरण जवळजवळ दीड दोन वर्षांनी जनतेपुढे येत असल्याचे दिसून येते आहे.

बॅ. जीना हे पाकचे शिल्पकार होते हे खरे असले तरी त्यांचे अवघे आयुष्य, कर्तृत्व फुलले मुंबईत. त्यामुळे त्यांनी ऋण फेडण्याच्या भूमिकेने ही देणगी दिली असावी. देणगी कुणी कुणास व का द्यावी याबद्दल कुणालाही निर्णायक असे काही सांगता येणे कठीण ! ती देणगी दिल्यानंतर ती स्वीकारायची की नाही याबद्दल मात्र स्वीकारणारी व्यक्ती वा संस्थेला निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य असते. बॅ. जीना ह्यांनी दिलेल्या ह्या देणगीचा चेक संबंधित सॉलिसिटर्सकडून विद्यापीठाकडे मे १९६७–मध्ये आला. बॅ. जीना यांच्या मृत्युपत्राअन्वये ही देणगी देण्यात आली असल्याचे त्या चेकसोबतच्या पत्रात म्हटले होते. १९६८ च्या डिसेंबरमध्ये मृत्युपत्राची प्रत विद्यापीठ चालकांचे हाती पडली. मृत्यूपत्राची प्रत पाकमधून येण्यास विलंब झाला असे गृहित धरले तरी अनपेक्षितरीत्या आलेल्या ह्या देणगीसंबंधी विद्यापीठाच्या सर्वाधिकारी यंत्रणेने–सीनेटने काही निश्चित निर्णय घेण्यापूर्वीच विद्यापीठ चालकांनी तो चेकही वटवला. चेक वटविला जाणे याचा पर्यायी अर्थ 'देणगी स्वीकारली' असाच होतो नाही काय ? असा अर्थ समजा सॉलिसिटर्स वा जीनांच्या मालमत्तेचे जे कोणी विश्वस्त असतील त्यांनी घेतला तर त्यात अतार्किक काय आहे ? आणि आता दीड दोन वर्षानंतर "ती देणगी सशर्त असल्यास ती नाकारण्याचा" जो निर्णय सिनेटने घेतला आहे तो पश्चातबुद्धीचा, रीतभात सोडून आणि शिष्टाचाराला तिलांजली देणारा आहे असे म्हटल्यास (विश्वस्तांनी वा अन्य कुणीही) त्यात गैर काय ठरेल ?

मग हा चेक वटला कसा ? कुणाच्या अनुमतीने वटला ? कुलगुरूंना तसा अधिकार असला तरी सिंडिकेटचे ते अध्यक्ष असल्याने त्यांनी याबाबत सिंडिकेटला कल्पना दिली होती काय ? दिली नसल्यास का दिली नाही ? देण्यास इतका काळ वाट पाहण्यात का आली ? मे १९६७ ते जानेवारी १९६९ हा काळ 'अल्प वा



अत्यल्प' म्हणता येईल काय ? ह्या काळात अशी एक देणगी विद्यापीठाकडे आली असल्याची जाणही सिनेटच्या सदस्यांना नव्हती असे दिसते. जानेवारी १९६९-मध्ये सिनेटपुढे हे प्रकरण आल्यानंतरही ह्या विषयात मतैक्याचा अभाव दिसल्याने अखेर हे प्रकरण कुलगुरूंवर सोपविण्यात आले. आणि आता ती देणगी 'सशर्त असल्यास स्वीकारू नये' असा निर्णय १९७०-च्या नोव्हेंबर महिन्यात घेण्यात आला आहे. चेक १९६७ सालीच वटवून घेतल्यानंतर नोव्हेंबर १९७० मध्ये आता 'सशर्त'चे निमित्त करून निर्णय घेण्यात आला आहे. वास्तविक ही भारी दिरंगाई का ? कुणामुळे घडली ? चेक वटविण्याचा निर्णय कुणी घेतला ? तो सिंडिकेटला ठाऊक होता ? सिंडिकेटमधील दोन तट कोणते ? ही देणगी स्वीकारावी अशा मताचे सदस्य कोण ? आदि अनेक गोष्टींवर प्रकाश पाडणे अगत्याचे आहे. केवळ बॅ. जीनांची देणगी म्हणून नव्हे, तर विद्यापीठाच्या एकूण कारभारात कुठे काही कमजास्त असेल तर तेही ह्या निमित्ताने साफ व्हावे म्हणून ! बॅ. जीना यांची ही देणगी सशर्त असली व त्यांच्या नावाचे कसलेही 'स्मारक' त्याच्याशी निगडीत असेल तर ती देणगी मुळीच स्वीकारू नये असे कुणीही स्वाभिमानी भारतीय म्हणेल. परंतु माझ्यामते तर बिनशर्त अशी ही देणगी असली तरीही ती स्वीकारण्यात येऊ नये. भारताचे विभाजन करून त्याच्या मातृरूपावरच आघात करणाऱ्या बॅ. जीना यांच्या नावाने भारताचे कुठलेच विद्यापीठ वा कुठलेही ज्ञानकेंद्र 'पावन' वा 'कलंकित' व्हावे असे आम्हास वाटत नाही. यात राष्ट्राचा मान सन्मानच मुळी कसोटीला लावला जात आहे. 'आमचा पैसा आम्ही उभारू' 'आमच्या समस्या आम्ही ताठमानेने सोडवू' अशी जिद्द याबाबत व्यक्त

करणे आवश्यक आहे. ह्या 'देणगी'च्या कुठल्याही रूपाला आमचा विरोध आहे. रकमेचा प्रश्न नाही. राष्ट्राचा मान, इभ्रत, रक्षणच जेव्हा पणाला लागते तेव्हा अंगावरचे दागिने वा जवळचा पैसा काढून देण्याची त्यागमय परंपरा अजून इथे नांदते. अनेक लहान मोठ्या संकटातही पन्नास हजाराहून कितीतरी अधिक रक्कम आम्ही उभी केली आहे. शतकांचा इतिहासच उध्वस्त करून भारताच्या डोक्यावर टांगती तलवार कायम ठेवणाऱ्या बॅ. जीना यांच्या पन्नास हजाराच्या (वा कुठल्याही) देणगीपेक्षा भारत, महाराष्ट्र व त्यातही मुंबई विद्यापीठ यांची शान जास्त मोलाची व महत्त्वाची आहे. निदान ह्या विषयावर तरी विद्यापीठात 'मतभेदा'चे केविलवाणे दृश्य दिसायला नको होते असे प्रामाणिकपणाने वाटते. चूक सुधारली की कलंक नाहीसे होतात. विद्यापीठाने चेक वटवून घेण्याची चूक केली आहे. देणगी नाकारून कलंक धुवून काढावा अशी आम्ही अपेक्षा करतो. —सारस्वत

(पान ५ वरून—स. न. वि. वि.)

## दर्जेदार साहित्याने भरगच्च अंक

स. न. वि. वि.

यंदा परीक्षांमुळे दिवाळी अंक उशीराच घेतले. अंकाचा दर्जा नेहमीप्रमाणेच उत्तम होता.

आपण घडविलेले संस्कृत नाट्य-नायिकांचे दर्शन व 'चिरंजीव अश्वत्थामा' ही पत्रकाराच्या जीवनावरील कादंबरी 'दीपावली'च्या दिवाळी अंकाचे वैशिष्ट्य वाटले.

परिसंवादात दुसरी बाजूही का मांडली नाही ?

'रसना'चे पदार्थ अर्थात सीमेचा खिमा वगैरे पदार्थ फारच आवडले. हे पदार्थ टिकतातही व येताजाता खाल्ले असता रुचकरही लागतात.

दुर्गी, पुरुषसूक्त, मुलाखत, साठा उत्तराची कहाणी, बर्फ.... साली कुत्तेकी अवलाद इत्यादी कथा दीर्घकाळ स्मरणात राहतील. शृंगारातील ऋतुचक्र व शिवरायांचे लिहिणे कैसे हे लेख चिंतनीय वाटले. एकंदरीत अंक संग्राह्य !

फॅमिली बिल्डिंग
परळ, मुंबई-१२.
१६-११-७० आपला
र. वि. बनसोडे

## गटबाजीचा भेद

स. न. वि. वि.

आपला 'दीपावली'चा दिवाळी अंक उत्सुकतेनं विकत घेऊन प्रथम चाळला अन् परवाच तो वाचून पूर्ण केला. मासिकातील 'लेखक-कवीं'च्या गटबाजीविरुद्ध अधूनमधून ओरड होऊनही आमूलाग्र बदल होत नाही. याला अपवाद म्हणून दीपावली मासिक डोळ्यापुढे आले. आपण नवं पण चांगल्याचा स्वीकार करण्याचा विवेक साकार केलात, त्याचीच ही फळं म्हणायला हवीत.

दीपावलीतील ह्या स्थित्यंतरातून कथा-काव्याला निश्चितपणे साजरा बहर आल्याखेरीज राहणार नाही. श्री. श्रीराम कामतांची कादंबरी आवडली. त्याचप्रमाणे 'लोकशाही'वरील असामान्यांचे विचार चिंतनीय वाटले. असं काही वाचायला मिळाले म्हणजे मनाला प्रसन्न वाटतं. समाधान मिळतं.

धरमपेठ, नागपूर-१.
१६-११-७० आपला
अंबादास देवळे

## चविष्ट नि मार्मिक साहित्य

स. न. वि. वि.

आपला दिवाळी अंक नेहमीसारखा वाळसेदार आहे. चित्रे तर आवडलीच. बाकीचे साहित्यही चविष्ट व मार्मिक वाटले. श्री. शा. गो. ताम्हनकर यांनी दिलेला फराळ दिवाळीच्या नेहमीच्या खुसखुशीत फराळात भर टाकणारा आहे. त्यांचे नाव त्या त्या पदार्थाखाली दिलेले नाही, पण अनुक्रमणिकेवरून ते समजते. त्यांचे अभिनंदन ! बाकीचे साहित्यही दर्जेदार आहे.

मुंबई-७०.
१४-११-७० आपला
गो. स. जोशी

(पान २० वरून—अ-पूर्व जर्मनी)

केले जाते. पूर्व जर्मनीत जशी लायपझीगला आंतरराष्ट्रीय व्यापारी जत्रा भरते तशी पश्चिम जर्मनीत फ्रॅंकफटला. सध्या हेमंत व्यापारी जत्रा भरली होती. ती सकाळी पाहायला गेलो.

एका अवाढव्य आवारात ही जत्रा भरली होती. या सामान-प्रदर्शनात अनेक विभाग होते. सभोवती एक छोटी रेल्वे फिरत असते. पुण्याचा पेशवेपार्कमधील फुलराणीच जणु. त्यात कुठेही बसावे व कुठेही उतरावे, ते सुद्धा मोफत ! या जत्रेतील काही भागच पाहायला सहा तास लागले. काही विभाग तिसऱ्या-चौथ्या मजल्यावर होते. तेथे सरकत्या विजेच्या जिन्यांनी जावे लागले. जगातील मालाच्या अत्याधुनिक फॅशनस् येथे येतात. ब्लोअप् फर्नीचर एका ठिकाणी होते. हवा भरून जमिनीपासून सुमारे दीड फूट उंचीचे सोफा-सेट तयार केले होते. त्यावर बसून पाहिले. एखाद्या पेढीच्या मऊ गादीवर बसल्याप्रमाणे वाटले. घडाळ्याच्या बनावटी तर किती होत्या.

फ्रॅंकफर्ट हा जगश्रेष्ठ गटे कवीचा गाव. येथे गटे हाऊस व संग्रहालय आहे. गटे हा कवी, तत्वज्ञ तसाच राजकारणी होता. कालीदासाचे 'शाकुंतल' डोक्यावर घेऊन तो आनंदाने नाचला त्यामुळे त्याच्याबद्दल आत्मीयता होतीच. गटेगृहात त्याची सर्व हस्तलिखिते व्यवस्थित जपून ठेवलीत. स्वयंपाकघर तर असे लावून ठेवले आहे की, जणु काही तिथे रोज स्वयंपाक अजूनही होत असतो. त्याचा भव्य पुतळा पाहिला. उजवा पाय किंचित वाकवून पुढे टाकला आहे. हा मुत्सद्दी कवीराज जगाकडे तत्वज्ञानाच्या अनिमिष नजरेने अजूनही पहात आहे. जगातील नाटककारात शेक्सपिअरचे, कादंबरीकरात टॉल्स्टॉयचे जे स्थान आहे तेच स्थान कविमंडळात गटेचे !

[क्रमशः]









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment DECEMBER 1970

DIPAVALI MONTHLY





Cover Printed At Asha Printery, Bombay 4.

अनुक्रमणिका






